स्वामी श्रीसत्यदेव परिव्राजक रचित

अभिनव-ग्रंथमाला.

पुष्प १ लें.

# अमेरिका-पथदर्शक

संपादक—

श्रीधर नारायण हुद्दार, वाङ्मय विशारद

प्रस्तावना लेखक—

दामोदर विश्वनाथ गोखले बी. ए. एल् एल्. बी.

संपादक 'मराठा'

अमेरिका व जर्मनीचे सुप्रसिध्द प्रवासी स्वामी
श्रीसत्यदेव परिव्राजक रचित.

# अभिनव-ग्रंथमाला-विनंति पत्रक.

संपादक—श्रीधर नारायण हुद्दार वाङ्मयविशारद.

स्वामी श्रीसत्यदेव ह्यांच्या खास परवानगीनें त्यांच्या देशभक्तिपर, स्फूर्तिदायक, बोधप्रद, उदात्त व अभिनव विचारांनीं भरलेल्या आणि हृदयंगम व चित्ताकर्षक भाषेंत लिहिलेल्या उत्तमोत्तम ग्रंथांचा मराठी वाचकांना परिचय करून देण्याचे हेतूनें अभिनव-ग्रंथमाला सुरूं करण्यांत येत आहे. सहरहू मालेचें प्रथम पुष्प अमेरिका पथदर्शक आज प्रसिद्ध होत असून दुसरें पुष्प 'अमेरिका दिग्दर्शन' हें सुमारें तीन महिन्यांनीं प्रसिद्ध करण्यांत येईल. त्यानंतर 'वेदांताचा विजयमंत्र' 'राजर्षिभीष्म,' 'मानवी अधिकार,' 'अमेरिका भ्रमण' वगैरे (ज्यांच्या हिंदी भाषेंत पांच पांच सहा सहा आवृत्या निघून सर्वत्र प्रचार झाला आहे अशीं) १५-१६ पुस्तकें वर्षातून ४।५ या प्रमाणें प्रसिद्ध करण्यांत येतील. मालेच्या ग्राहकांचे खालीलप्रमाणें वर्ग करण्यांत आले आहेत:—

१ हितचिंतक-एक किंवा दोन मासिक हप्त्यांनीं २० रु. ची रक्कम देणारांस मालेचे हितचिंतक समजलें जाईल. मालेतर्फे प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक पुस्तकाची एकेक प्रत हितचिंतकांस मोफत पाठवण्यांत येईल; व मालेंत प्रसिध्द करावयाचीं सर्व (१५-१६) पुस्तकें सुमारें तीन वर्षांत प्रसिद्ध झाल्यावर हितचिंतकाची रक्कम रु. २० ज्यांची त्यांस परत करण्यांत येईल.

२ सहाय्यकः-एकदम पांच रुपये देणारांस मालेचे सहाय्यक समजलें जाईल. व मालेतर्फे प्रसिध्द होणाऱ्या प्रत्येक पुस्तकाची एकेक प्रत सहाय्यकांस मोफत पाठविण्यांत येईल.

स्वामी श्रीसत्यदेव परिव्राजक रचित

## अभिनव-ग्रंथमाला

पुष्प १ लें

# अमेरिका-पथदर्शक.

Say fellow ! Why rot here ?
Let us go out and see the World.

—*Traveller.*

संपादक व प्रकाशक–

**श्रीधर नारायण हुद्दार, वाङ्मयविशारद.**

प्रस्तावना लेखक–

**दामोदर विश्वनाथ गोखले, बी. ए. एल् एल्. बी.,**
संपादक 'मराठा'.

व्हेंबर १९२५ } प्रथमावृत्ति { किंमत ८ आणे

# प्रस्तावना.

स्वामी सत्यदेव यांच्या सुप्रसिद्ध 'अमेरिका-पथ-दर्शक' या पुस्तकानें हिंदी तरुणांना ज्ञान व अनुभव मिळविण्याचा एक नवाच मार्ग दाखवून दिलेला आहे. १९११ सालीं या पुस्तकाचा हिंदी भाषेमध्यें अवतार झाला व त्या पुस्तकानें हिंदी भाषेच्या कक्षेतील प्रांतांत अमेरिकेच्या प्रवासाची मोठीच गोडी उत्पन्न केली. शेंकडों हजारों गरीब पण उत्साही व धाडशी अशा विद्यार्थ्यांनीं आपली जिज्ञासा व ज्ञानाची भूक अमेरिकेंत जाऊन तृप्त करून घेतली आहे. स्वामी सत्यदेव यांच्या या पुस्तकानें या दृष्टीनें अत्यंत मोठी कामगिरी केली आहे यांत शंका नाहीं.

परदेशांत जाणाऱ्या हिंदी लोकांमध्यें मजुरांचा भरणा फार असतो व प्रांतवार पाहूं गेल्यास व परदेशी जाणाऱ्या मजुरांच्या संख्येचाच विचार केल्यास, महाराष्ट्राचा नंबर शेवटचाच लागेल, किंबहुना त्याला नंबरहि मिळणार नाहीं. महाराष्ट्रांत गेल्या दहावीस वर्षांत बरेचसे विद्यार्थी मात्र जाऊं लागले आहेत व ही संख्या वाढत्या प्रमाणावर आहे, ही फारच आनंदाची गोष्ट आहे. जपान, इंग्लंड अगर युरोपखंडांतील इतर देशांत विद्यार्जनाकरितां जाण्यापेक्षां अमेरिकेंत जाणें अधिक श्रेयस्कर आहे. युरोपांतच जावयाचें असल्यास जर्मनी देश सर्वांत सोयीचा; पण स्वावलंबी गरीब विद्यार्थ्यांस अमेरिका देशच हात देऊं शकतो. अर्थात् अमेरिकेच्या प्रवासाची व तेथें गेल्यावर कोणत्या तऱ्हेनें राहणें अधिक सोयीचें व फायदेशीर आहे, हें माहित असणें अत्यंत जरूर आहे. अशा माहितीचीं जितकीं पुस्तकें होतील तितकीं बरी. किंबहुना अशा प्रवासाची व तिथें मिळणाऱ्या उद्योगधंद्यांची व सोयींची माहिती करून देणाऱ्या सुसंघटित संस्था उत्पन्न करण्याचीहि अत्यंत जरूरी आहे.

स्वामी सत्यदेव यांनीं त्यांचें पुस्तक १९११ सालीं लिहिलें. त्यानंतर अमेरिकेची माहिती देणारी साधनेंहि पुष्कळ निर्माण झालीं. अनेक विद्यार्थीहि तिकडे गेले. तेथील परिस्थितींतहि एवढ्या काळांत पुष्कळ फरक पडला आहे. तथापि स्वामीजींच्या पुस्तकांत देशभक्तीचा, स्वाभिमानाचा व कणखर वृत्तीचा जो एक सूर आहे तो महत्त्वाचा आहे. भाषांतर करणारे रा. हुद्दार यांनींहि ते

सूर कायम ठेविला आहे. मराठी भाषेंत हें पुस्तक असल्यानें याचा फायदा मराठी जिज्ञासू विद्यार्थ्यांनीं जरूर घ्यावा.

देशाच्या उन्नतीचे विचार कमी अधिक प्रमाणानें सर्वच करीत असतात. पण त्याबरोबर त्या विचारांना व्यवहाराच्या मर्यादेंत आणण्याचें सामर्थ्य परिस्थितीनें फारच थोड्यांच्या आंगीं असतें. पण स्वतःच्या उद्योगास ससुंस्कृत रूप दऊन स्वतःचा अर्थ साधीत असतांनाच राष्ट्राचाहि अर्थ साधतां येत नाहीं, असें नाहीं. अमेरिकेसारख्या देशांत जाऊन कान, डोळे व बुद्धि जागृत ठेवल्यास पुष्कळच ज्ञानार्जन कोणासहि या दृष्टीनें करतां येईल. स्वतंत्र देशांतील हवा स्वातंत्र्यानेंच भरलेली असते. माझ्यामतें राष्ट्रकार्य करूं इच्छिणाऱ्यांनीं एकवार तरी परकीय स्वतंत्र देशांत तरुणपणीं जाऊन यावेंच यावें. या दृष्टीनें रा. हुद्दार यांचें हें पुस्तक उद्बोधक व विचारांस चालना देणारें आहे. पुस्तकाच्या शेवटीं भारतीय प्रवाश्यांना अनुलक्षून असणारा अमेरिका-प्रवेशाचा कायदा ( American Immigration Act ) व अमेरिकेच्या प्रवासास युरोप व जपान द्वारें जाण्यास लागणारे प्रचलित आगबोटींचें दर परिशिष्ट रूपानें देण्यांत आल्यामुळें पुस्तक फारच उपयुक्त झालें आहे.

रा. हुद्दार हे टिळक महाराष्ट्र विद्यापीठाचे पदवधिर आहेत व त्यांनीं आपली लेखणी असल्या विषयाकडे वळविली, याबद्दल मी त्यांचें अभिनंदन करतों.

मराठा कचेरी, पुणें.<br>
ता. १७–८–२५

दामोदर विश्वनाथ गोखले.

# भूमिका.

अमेरिका हा देश असा आहे कीं, जेथें मनुष्याच्या सर्व इच्छा पूर्ण होऊं शकतात. विद्येची आवड असणाऱ्यांना तेथें विद्या मिळूं शकते, धनाची इच्छा असणाऱ्या इसमांना तेथें द्रव्यार्जन करण्याची साधनें प्राप्त करून घेतां येतात, कीर्तीची चाड असणाऱ्यांना कीर्ति मिळविण्याला तेथें बराच अवसर मिळतो. फार काय सांगायचें, ज्याला ज्या ज्या वस्तूची इच्छा असेल, ती ती वस्तु त्याला तेथें मिळवितां येईल. भारत देशांत हल्लीं बऱ्याच बाबींची उणीव दिसून येते. विद्यार्थ्यांच्या शिक्षणाकरितां येथें सर्वप्रकारची सामुग्री नाहीं, ही सर्व अमेरिकेंत असल्याचें त्याला आढळून येईल. गरीब विद्यार्थी तेथें जाऊन, आपल्या मनगटाचे जोरावर, आपल्या शरीरांतील ईश्वरदत्त शक्तींचा योग्य उपयोग करून, मोठी योग्यता प्राप्त करून घेऊं शकतो; व आपल्या देशांत परत आल्यावर तो मातृभूमीची सेवा करण्यास उद्युक्त होऊं शकतो. भारतवर्षाला कृषिज्ञानाची आवश्यकता असेल, तर ही उणीव अमेरिकेंत जाऊनच भागवितां येईल. आम्हांस व्यापारांतील कसब साध्य करून घेऊन, पुष्कळ धनार्जन करावयाचें असेल, तरी अमेरिकेसच गेलें पाहिजे. उत्तम प्रकारचीं घरें बांधावयाची झाल्यास, ह्यासंबंधीची विद्या शिकण्यासहि अमेरिकेस गेल्याशिवाय गत्यंतर नाहीं.

सांगावयाचें इतकेंच कीं, भारतभूमीचें दारिद्र्य घालविणाऱ्या साधनांचें ज्ञान करून घेण्यास आम्हांस अमेरिकेस जाणें अत्यावश्यक आहे. आपल्या देशांतील तरुण पिढीचें लक्ष इकडे जात चाललें आहे, हे ईश्वराचे आपल्यावर खरोखरीच फार उपकार आहेत. त्यांना असें वाटूं लागलें आहे कीं, आपण परदेशांतून सामान आणून मातृभूमीला समृद्ध करावें, परंतु त्या बिचाऱ्यांना अमेरिकेस कसें जातात, हेंहि पुरतेपणीं माहित नसतें. ज्यांचे जवळ पैसे आहेत, ते अशा प्रकारचा उच्च हेतु मनांत बाळगून, अमेरिकेपर्यंत जाण्याचे श्रमहि घेत नाहींत. जे बिचारे गरीब असतात, ते विचार करकरीतच रडत बसतात. धनार्जनाची इच्छा असलेले लोक, तर अमेरिकेपासून कसा फायदा करून घेतां येईल, हें मुळीं जाणतच नाहींत.

अशा देशबांधवांच्या सेवेकरितां मीं हें पुस्तक लिहिलें आहे. प्रथम मीं आपली रामकहाणी सांगितली आहे. तींत मी अमेरिकेस कसा पोहोंचलों, माझ्यावर कोणकोणतीं संकटें आलीं वगैरे संबंधीची सर्व माहिती दिली आहे. ही हकीकत वाचून त्यांना थोडातरी फायदा खास होईल. त्यानंतर अमेरिके-संबंधी सर्व माहिती प्रश्नोत्तररूपानें दिली आहे. हें पुस्तक शक्य तितकें उपयुक्त करण्याचा मी यथाशक्ति प्रयत्न केला आहे. हें पुस्तक वाचून यापासून माझे देशबांधव योग्य बोध घेतील अशी मला आशा वाटते.

काशी,<br>
३० आगष्ट १९११

नम्र,<br>
सत्यदेव परिव्राजक.

---

# संपादकीय मनोगत.

उत्तर हिंदुस्थानांत ज्या थोड्याफार थोर व्यक्ति आज विद्यमान आहेत त्यांत **स्वामी श्रीसत्यदेव** ह्यांचीहि प्रामुख्यानें गणना होते. स्वामीजींचे कार्य राजकीय, सामाजिक व धार्मिक अशा तीन प्रकारचें असून हिंदी प्रांतांत ते हल्लीं संचार करीत करीत लोकजागृतीचें कार्य करीत असतात. वाङ्मयसेवेचेंहि कार्य त्यांनीं अखंड चालविलें असून परप्रांतीय लोकांस त्यांच्याशीं परिचय करून घेण्यास त्यांचे वाङ्मय हें एक फार चांगलें साधन आहे. बेळगांवचे सुप्रसिद्ध वकील श्रीयुत नागेश वासुदेव गुणाजी यांनीं स्वामीजींच्या 'अमेरिकन विद्यार्थीयोंके परिश्रम' ह्या सुंदर पुस्तकाचें मराठींत रूपांतर करून व तें मनोरंजक ग्रंथप्रसारक मंडळीकडून प्रसिद्ध करवून प्रथमच स्वामीजींचा मराठी वाचकांना परिचय करून दिला आहे. 'अमेरिकेंतील गरीब विद्यार्थी' हें पुस्तक वाचूनच आम्हांस स्वामी सत्यदेवांची इतर पुस्तकें वाचण्याची जिज्ञासा झाली व ह्या जिज्ञासेचें प्रत्यंतर आज '**अमेरिका पथ दर्शक**' हें पुस्तक प्रसिद्ध करण्यांत होत आहे. स्वामी सत्यदेव ह्यांनीं अमेरिका व जर्मनीसारख्या अर्वाचीन सुसंस्कृत राष्ट्रांत उदंड संचार करून आपल्या विविध विषयांच्या ज्ञानांत व अनुभवांत भर घातली आहे. राष्ट्रीय विचारसरणी व सडेतोड व बाणेदारवृत्ति ह्या गुणांचा स्वामीजीमध्यें सुंदर मिलाफ झाला असून एककल्ली-पणा व एखाद्या गोष्टीचा फाजील अभिमान बाळगणें ह्या वृत्तींचा त्यांच्या ठिकाणीं सर्वस्वीं अभाव दिसून येतो.

अमेरिकेंतून स्वदेशांत परत आल्यावर लोकसेवा व मातृभाषेची सेवा ह्या दोन उद्देशांना अनुसरून त्यांनीं '**सत्यग्रंथमाला**' गुंफण्यास सुरुवात केली. अमेरिकेंतील स्वावलंबी विद्यार्थी, अमेरिकेंतील शिक्षणपद्धति, तेथील खाण्या-पिण्याची पद्धति, प्रवासांतील अडचणी, अमेरिकेंतील अनुभव वगैरेंची माहिती हिंदी तरुणांना असणें इष्ट आहे म्हणून 'अमेरिकाके निर्धन विद्यार्थियोंके परिश्रम', 'अमेरिका पथ प्रदर्शक', 'अमेरिका दिग्दर्शन', 'अमेरिका भ्रमण' हीं पुस्तकें त्यांनीं प्रथमतःच प्रसिद्ध केलीं व त्यानंतर अनेक इतर उपयुक्त व सुंदर पुस्तकें प्रसिद्ध केलीं. आजवर सदरहू मालेतर्फे त्यांनीं १८–१९ पुस्तकें

प्रसिद्ध केलीं आहेत. त्यांची सर्वच पुस्तकें राष्ट्रीय विचारांना चालना देणारीं अर्थात् देशभक्तिपर, स्फूर्तिदायक, बोधप्रद व अभिनव विचारांनीं भरलेलीं असून त्यांतील भाषा जोरदार, चित्ताकर्षक व चटकदार आहे. अशा महनीय व्यक्तीच्या वाङ्मय संपत्तीपासून महाराष्ट्रीयांना बराच फायदा करून घेतां येण्यासारखा आहे, असें वाटल्यावरून, आम्हीं गेल्या उन्हाळ्यांत **अमेरिका पथ प्रदर्शक** व **अमेरिका दिग्दर्शन** ह्या स्वामीजींच्या दोन पुस्तकांची मराठींत रूपांतरें केलीं व हीं रूपांतरें प्रसिद्ध करण्याबाबत स्वामी सत्यदेवांची परवानगी मागितली व आनंदाची गोष्ट ही कीं, त्यांनीं ती मोठ्या आनंदानें दिली. पुस्तक छापण्याचे काम सुरूं असतां, 'स्वामीजींचे सर्वच ग्रंथ तेजस्वी आहेत. ते मराठीतून प्रसिद्ध झाल्यास मराठी रसिकांस ज्ञानप्राप्तिबरोबरच मनोरंजनाहि करतां येईल' असा विचार मनांत आला; व या विचाराप्रमाणें आम्हीं आपलें मनोगत स्वामीजींना कळविलें व त्यांनीं त्यांच्या सर्वच (२-३ ग्रंथ सोडून) ग्रंथांचा अनुवाद करण्यास आम्हांस परवानगी दिली. ह्या अनुज्ञेमुळें आमचे कार्यक्षेत्र अधिक विस्तृत होऊन त्याबरोबरच जबाबदारीहि वाढली व हें प्रकाशनाचे कार्य बिनहरकत व सुव्यवस्थितपणें करतां यावें म्हणून, '**अभिनव ग्रंथमाला**' सुरूं करण्याचें आम्हीं निश्चित केलें; व सुदैवानें आज मालेचे प्रथम पुष्प '**अमेरिका पथ दर्शक**' वाचकांस सादर करण्यांत येत आहे.

मालेच्या पहिल्या पुष्पांतच सत्यग्रंथमालेचे चालक **स्वामी श्रीसत्यदेव** ह्यांचे थोडे विस्तृत चरित्र देणें अवश्य होतें. चरित्र मिळविण्याची आम्हीं बरीच खटपटहि केली, परंतु हें पुस्तक छापून होईपर्यंत स्वामीजींचे चरित्र आमच्या हातीं न पडल्यामुळें तूर्त त्रोटक चरित्रावरच वाचकांनीं आपली जिज्ञासा तृप्त करून घेणें अवश्य आहे. चरित्रविषयक माहिती लवकरच पुरविण्याचें लाहोरच्या एका सद्गृहस्थानीं आश्वासन दिलें असून पुढील पुस्तकाच्या आरंभीं ही माहिती देतां येईल असा भरंवसा वाटतो.

बालब्रह्मचारी स्वामी श्रीसत्यदेव हे पंजाब प्रांतांत लुधियांना गांवीं इ० स० १८८० त जन्मले. त्यांचे वडील थोड्या पगारावर सरकारी नोकरींत कामावर होते. त्यांचे कुटुंब मोठें असल्यामुळें साहजिकच त्यांचे घरीं खर्चाची नेहमीं तंगी असे. तथापि लाहोर येथील अँग्लोवेदिक हायस्कूलांत अभ्यास करून सत्यदेव १८९७ सालीं विद्यापीठाच्या प्रवेश परीक्षेंत उत्तीर्ण झाले. ह्याच वर्षी

त्यांच्या लग्नासंबंधीं घरच्या वडील मंडळीत चर्चा सुरूं झाली परंतु स्वामी सत्यदेवांनीं लग्न करून घेण्याचें साफ नाकारिलें. त्यांची नाखुषी असतांहि वडिलांच्या आग्रहास्तव व कौटुंबिक अडचणींना धैर्यानें तोंड देतां यावें म्हणून, त्यांनीं नोकरी पत्करिली.परंतु सहा महिन्याच्या आंतच त्यांनीं नोकरीस कायमचा रामराम ठोकला. तदनंतर संस्कृतचे अध्ययन करण्याकरितां ते बनारसला गेले. १८९९ सालीं मातोश्रींच्या आजारीपणामुळें त्यांस लाहोरास परत जावें लागलें. लाहोरास असतां ते तेथलि अँग्लोवेदिक कालेजांतच दाखल झाले. मातोश्रींचा दुखण्यांतच दुर्दैवानें अंत झाला. त्यानंतर १९००त त्यांनीं कॉलेज सोडलें; व फिरून बनारस क्षेत्रीं जाऊन संस्कृतचें अध्ययन करण्यास त्यांनीं सुरुवात केली. बनारसच्या हिंदु कॉलेजांतहि त्यांनीं कांहीं काळ अध्ययन केलें व हें सर्व स्वतःच्या हिंमतीवर व मनगटांतलि बळाच्या जोरावर. १९०४ सालीं त्यांनीं हिंदु कॉलेज सोडलें व अनेक हालअपेष्टा सोसून व अडीअडचणींतून मार्ग काढून ते अमेरिकेंत दाखल झाले. त्यांच्या अमेरिकेच्या प्रवासाची हकीकत ह्याच पुस्तकांत दिली असून तेथलि निवासांची व तेथें आलेल्या विविध अनुभवांची माहिती त्यांनीं आपल्या ‘ अमेरिका दिग्दर्शन ’ व ‘ अमेरिका भ्रमण ’ ह्या पुस्तकांत ग्रथित केली आहे.

शिकागो, ऑरेगान व वाशिंग्टन ह्या विश्वविद्यालयांत त्यांनीं चार वर्षेंपर्यंत अर्थशास्त्र व राजकारण ह्या विषयांचा अभ्यास केला व नंतर पायानींच अमेरिकेंत बराच प्रवास केला. अमेरिकेंत अशा प्रकारें सुमारें ५॥ वर्षें घालविल्यावर स्वामी सत्यदेव स्वदेशीं परत आले व लागलीच त्यांनीं आपल्या ज्ञानाचा व अनुभवाचा फायदा आपल्या देशबांधवांना देण्याच्या इराद्यानें आपल्या मातृभाषेंत ‘ सत्यग्रंथ माला ’ सुरूं केली हें वर सांगितलेंच आहे. स्वामीजींचीं पुस्तकें बरींच लोकप्रिय झालीं असून कांहीं कांहीं पुस्तकांच्या ६।६ देखील आवृत्त्या निघाल्या आहेत.

स्वामी सत्यदेवांचा अशा प्रकारें अल्पपरिचय करून दिल्यावर आभार प्रदर्शनाचे तेवढें गोड काम राहिलें आहे. **अभिनव ग्रंथमाला** सुरूं करण्यास आपली अनुज्ञा देऊन व आपले कांहीं फोटो पाठवून स्वामी सत्यदेवांनीं आम्हांस कायमचेंच ऋणी करून ठेविलें आहे,अर्थातच स्वामीजींचा कृतज्ञतापूर्वक प्रथमच उल्लेख करणें अवश्य आहे. टिळकमहाविद्यालयांत घडून आलेल्या अल्प

परिचयावरून आम्हीं गुरुवर्य दा० वि० गोखले, संपादक 'मराठा' यांस ह्या पुस्तकास प्रस्तानना लिहण्यास विनंति केली. आमची विनंति मान्य करून सुंदर प्रस्तावना लिहून दिली व स्वामी सत्यदेवांकडून परवानगी मिळवून देण्याचें कामीं त्यांनीं जी अमोल मदत केली याबद्दल त्यांचेहि आम्हीं फार ऋणी आहोंत. इतकेंही झाल्यावर पुस्तक प्रसिद्ध करणें आर्थिक अडचणिमुळें अशक्यच होते, परंतु ही अडचणहि आमचे परमपूज्य ज्येष्ठ बंधु बाळासाहेब उर्फ जयदेव नारायण हुद्दार यांनीं वेळेवर आर्थिक साहाय्य करून दूर केली व यामुळेंच हें पुस्तक वाचकांस सादर करतां येत आहे. अर्थात् पुस्तक प्रसिद्ध झाल्याचे बहुतेक श्रेय आमच्या ज्येष्ठ बंधूंच्या आर्थिक साहाय्याकडे आहे. अमेरिकेच्या परिस्थितींत व अमेरिकेच्या आगबोटींच्या दरांत बराच बदल घडल्यामुळें पुस्तकांतील माहिती अपूर्ण राहूं नये किंवहुना आजच्या परिस्थितींत गैर लागूं होऊं नये म्हणून आम्हीं दोन परिशिष्ट द्वारां भारतीयांना अनुलक्षून असलेला अमेरिकन इमिग्रेशन ॲक्ट व प्रचलित आगबोटींचे दर शेवटीं दिलें आहेत. ही परिशिष्टांतील माहिती मुंबईच्या Thos Cook & Son ह्या कंपनीनें पुरविल्याबद्दल आम्हीं सदरहू कंपनीच्या चालकांचे अत्यंत आभारी आहोंत. स्वामी सत्यदेवांचा ब्लॉक तयार करून दिल्याबद्दल बालोद्यान कार्यालयाचे मालक एस. बी. सहस्रबुद्धे यांचे, हस्तलिखित प्रत तयार करण्याचे कामीं सहाय्य केल्याबद्दल आमचे मित्र श्री० श्रीधर जनार्दन खोत यांचे व पुस्तक काळजीपूर्वक छापून देण्याचें कामीं परिश्रम घेतल्याबद्दल गणेश प्रिंटिंग वर्क्सचे मालक श्री० गणेश काशिनाथ गोखले व समर्थ प्रेसचे मालक श्री० श्रीपाद रघुनाथ राजगुरु यांचे आम्हीं अंतःकरणपूर्वक आभार मानतों.

महाराष्ट्र जनतेकडून सदरहू **अभिनव ग्रंथमालेस** योग्य आश्रय मिळेल अशी अपेक्षा बाळगून व ज्या श्रीरामचंद्र प्रभूचें कृपेंकरून हें अल्प कार्य घडून आलें त्याचें स्मरण करून आम्हीं हें आभार प्रदर्शनाचें काम संपवितों.

३६८ नारायण पेठ, पुणें<br>
ता. १७ आक्टोबर १९२५

**श्रीधर नारायण हुद्दार.**

# अमेरिका-पथ-दर्शक

## मी अमेरिकेस कसा पोहोंचलों.

१९०४ सालचें शेवटीं शेवटीं अमेरिकेस जाण्याची मला इच्छा झाली. ह्यापूर्वी कित्येक वर्षें अगोदरपासून नवीन खंड पाहण्यास जाण्याचें विचार माझे मनांत घोळत होते. परंतु हा वेळपर्यंत त्यासंबंधीं निश्चय असा मी कांहींच केला नव्हता परंतु जेव्हां अमेरिकेस गेलेल्या हिंदी प्रवाश्यांची वर्तमान पत्रांतील पत्रें व उत्तेजनपर लेख माझ्या वाचण्यांत आले तेव्हां अमेरिकेस जाण्याचा मी निश्चय केला, व त्यानंतर माझें सर्व लक्ष अमेरिकेस जाण्याकडेसच लागून राहिलें.

नोव्हेंबरमध्यें लाहोरमध्यें उत्सवांची एकच गर्दी असते. काशीच्या कित्येक मित्रांबरोबर मीहि लाहोरास जावयाचें ठरविलें. असें करण्यांत माझा दुसराहि एक उद्देश होता. पंजाब प्रांत ही माझी जन्मभूमी असून तेथेंच माझे वडील व व आप्तबांधव राहत असत. ह्यानिमित्तानें तरी त्यांची भेट होईल असा विचार करून मी लाहोरास गेलों, व तेथें भाऊबहिणीबरोबर अमेरिकेस जाण्यासंबंधीं चर्चा करण्यास प्रारंभ केला. तेव्हां सर्व मंडळी माझी थट्टा करायला लागून मला कल्पनावादी ' शेख महंमद ' ह्या नांवानें संबोधू लागली. ते म्हणाले, ' तूं द्रव्याशिवाय अमेरिकेस जाणार तरी कसा ? " व खरोंखरींच मजजवळ तर पंधरा रुपयांपेक्षां अधिक कांहींहि नव्हतें.

जेव्हां माझ्या वडिलांना माझे विचार समजले, तेव्हां तर अधिकच मौज उडाली. वडीलांनीं माझी समजूत घालण्याचा पुष्कळ प्रयत्न केला ते म्हणाले, " देव, तूं भलताच अविचार करूं नकोस; विनाकारण तुला हालअपेष्टा व संकटें सोसावीं लागतील. " परंतु माझ्या डोक्यांत अमेरिकेस जाण्याचें भूत संचरलें

होतें. मी तर निर्धार केला कीं, प्राण गेला तर बेहत्तर पण अमेरिकेस गेल्याशिवाय राहणार नाहीं. मी आपल्या मित्रांनांहि भेटलों, व त्यांना आपले विचार कळविले; ते बिचारे मला कशी मदत करूं शकणार ? माझ्याबद्दल सहानुभूति दर्शवून त्यांनीं मला उत्तेजन मात्र दिलें.

आपल्या घरच्या मंडळींच्या व इतर सगेसोयऱ्यांच्या भेटी व समाचार घेऊन मी काशीला परत आलों. ह्यानंतर अमेरिकेच्या प्रवासाच्या विचारांत माझा एक एक दिवस जाऊं लागला. जेथें त्यासंबंधीं थोडी बहुत माहिती मिळेल, तेथें जाऊन मी आपल्या डायरींत माहिती टिपून घेऊं लागलों.मी अमेरिकेचा इतिहास वाचला व अमेरिकेच्या जलमार्गाचें ॲटलासवरून ( नकाशाचें पुस्तक ) सूक्ष्मपणें अवलोकनहि करून ठेविलें;व जोंवर शक्य होतें तोंवर साधनसामुग्रीहि जमविली व १९०५ च्या जानेवारी महिन्यांत काशी सोडावयाचें निश्चित केलें.

माझ्याजवळ अवघे पंधराच रुपये होते. हेंच माझें भांडवल. परंतु एकच गोष्ट सर्वांत विशेष होती. ती म्हणजे 'दृढनिश्चय ' ही होय. ईश्वरावर सर्व भार टाकून निर्धारानरहुकूम वागण्यास मी आरंभ केला; व जानेवारीच्या पहिल्या तारखेस कोणास कांहीं न कळवितां काशीहून कूच केलें. काशी सोडतांना काशी नगरीला शेवटचा नमस्कार करावयाचे वेळीं माझ्या मनांत जे विचार उद्भवले, त्यांचे वर्णन करणें कठीण आहे. जेव्हां गाडी डफरीन पूलाच्या पलीकडे गेली तेव्हांचे काशीचें प्रभातसमयीचें मनोहर दृश्य पाहून माझे डोळे पाण्यानें डबडबून आले, व तशाच स्थितींत सद्गदित कंठानें त्या पुण्यनगरीला शेवटचा प्रणाम करून, मी काशीचा निरोप घेतला.

ह्या प्रकारें दुःखपूर्ण अंतःकरणानें काशीपासून मी दूरदूर जाऊं लागलों. काशीहून अलाहाबाद, अलाहाबादेहून जबलपूर व जबलपुराहून मुंबईस मी गेलों, व तेथें मी आर्यसमाजाचे ठिकाणावर बिऱ्हाड ठेविलें. माझ्या पूर्वींच माझे मित्र रा. सोमदेव अमेरिकेस जाण्याच्या इराद्यानें मुंबईस आले होते. त्यांची भेट होऊन आम्हीं दोघेही अमेरिका-प्रवासाच्या विचारांत गुरफटून गेलों. आम्हीं दिवसभर मुंबई शहरांत इकडे तिकडे हिंडत असूं, व मुंबई बंदरावर जेथें जहाजें उभी राहतात तेथें आम्ही रोज जाऊन आपल्या दैवाची परीक्षा पहात असूं परंतु कोणत्याही प्रकारचें काम न मिळाल्यामुळें आम्हीं आपलें कम-

नशीब बरोबर घेऊन संध्याकाळीं रोज आपले बिऱ्हाडी परत येत असूं. जहाजावर आम्हांस नोकरी मिळाली नाहीं, कारण तेथें अनुभवी नावाड्यांची जरूरी होती. अर्थात् आमच्या सारख्या अडाणी इसमांची तेथें काय दाद लागणार ? अशा प्रकारें आमचे कित्येक दिवस फुकट गेले व आम्हीं निराशेच्या गर्तेत कोलमडून पडलों.

सोमदेवनें तर निराशेच्या आधीन होऊन अमेरिकेस जाण्याचा उद्योग करण्याचें सोडून दिलें; परंतु मीं आपलें धैर्य खचूं दिलें नाहीं. मी असा विचार केला कीं, कांहीं काळ देशांत इकडे तिकडे दौरे काढून थोडी बहुत देशसेवा करावी, व ह्या काळांतच कदाचित् मनोरथ सिद्धीचा एखादा मार्ग सुचून आपलें काम तडीस जाईल; व ईश्वरकृपेनें झालेंहि असेंच; चार महिने गुजराथ काठेवाडांत दौरे काढले व यथाशक्ति जनसेवा करण्यास आरंभ केला. शेवटीं शेवटीं एकदोन गृहस्थानीं माझ्याबद्दल सहानुभूति दाखविली. त्यांचा मी अत्यंत ऋणी आहे. विशेषतः काठेवाडांतील श्रीमंत जेठालालजींनीं मला जी उदारतेनें मदत केली त्याची आठवण मी केव्हांही विसरणार नाहीं.

इतकें झालें तरी अमेरिकेच्या प्रवासास लागणारें पुरेसें द्रव्य मजजवळ जमलें नाहीं. माहिती मिळवितां मला समजलें कीं, अमेरिकेस जाण्यास कमींत कमी ५०० रुपये लागतात. माझ्याजवळ पुरते तीनशेंही रुपये नव्हते. न्यूयार्कद्वारें जाण्यापेक्षां हांगकांग मार्गानें जाणें मला विशेष सोईचें वाटलें, हांगकांगकडून गेल्यास पैसे मिळविण्याला संधि मिळेल, व काम करून पुरेसें द्रव्य मिळाल्यावर अमेरिकेस जातां येईल, असा विचार करून मी कलकत्त्यास जावयास निघालों. व तेथून अमेरिकेस समुद्र मार्गानें जाण्याचें ठरविलें. कलकत्त्यास गेल्यावर अमेरिकेस जाऊं इच्छिणाऱ्या एका हिंदी विद्यार्थ्याशीं माझी मैत्री जडली. त्याचेजवळ अमेरिकेस जाण्यास पुरेसें द्रव्यही होतें. आम्हीं दोघांनीं मिळूनच सर्व सामान खरेदी केलें. माझ्याजवळ तीन कांबळी होत्याच. शिवाय मी एक लांब ओव्हरकोट व काळ्या बनातीचा एक सूट तयार करविला. माझ्याजवळ पुस्तकांची मोठी पेटी होती. ती बरोबर नेण्याचें मी ठरविलें. मी कोणतीही पुस्तकें नेली नसती तर विशेष चांगलें झालें असतें. मला पुस्तकें व इतर सामानाकरितां फार त्रास सोसावा लागला. अमेरिकेस जाणाऱ्या प्रवाशाजवळ जितकें कमी सामान

असेल तितकें चांगलें असतें. पुष्कळ कपडे नेण्याची जरूरी नाहीं. केवळ एक गरम सूट असला कीं पुरे आहे. बाकीचे कपडे तेथें गेल्यावर विकत घेतां येतात. एक काळा सूट अवश्य असावा; कारण अमेरिकन लोक काळे कपडे फार वापरतात.

आठ मे रोजीं जहाजावर जावयाचें होतें. अगदीं सकाळींच आम्हीं दोघेंही आपले सामान घेऊन कलकत्ता 'व्हार्फ'वर गेलों; तेथें एक विचित्र दृश्य पहावयास सांपडलें. चार पांचशें शीख आपआपलीं आवडीचीं पदें आनंदानें गात होते. ते इतके आनंदांत होते कीं, जणूं काय एखाद्या विवाहप्रसंगाकरितांच ते जात आहेत. आम्हीं तेथें गेल्यावर प्रथम डॉक्टरच्या तपासणी संबंधीं चवकशी केली. तेव्हां डॉक्टर—तपासणीचे नियम फार कडक आहेत असें आम्हांस कळलें. तिसऱ्या वर्गाच्या उतारूंच्या पेटींतील सर्व कपडे काढून त्यास वाफारा (Steam bath) देण्यांत येतो. तेव्हां मित्रांचा सल्ला घेऊन पीनांगपर्यंत सेकंड क्लासनेंच जावयाचें आम्हीं ठरविलें. एका बंगाली डॉक्टरानींही असाच सल्ला दिला माझ्याबरोबर येणारा मित्र ' आपकार ' कंपनीच्या आफिसांत गेला व त्यानें टिकिटें खरेदी केली. आतां डॉक्टरी परीक्षा केवळ नाडी पाहाण्यापुरतीच राहिली. लागलींच आम्हीं लहान लहान नांवांवर आपलें सामान ठेऊन जहाजावर पाठविलें. माझे मित्र सामान पाठविण्यांत गुंतले असतां मी घाटावर उभा राहून आपल्याशींच विचार करीत होतों. मीं म्हणालो,"आतां मात्र मी हिंदुस्थानांतून बाहेर जाणार! परदेशांत काय अवस्था होईल कोणास ठाऊक ! " एखाद्या अल्पवयी बालकाप्रमाणें माझें चित्त अगदीं अस्थिर झालें. परंतु जेव्हां मी शीखांकडे बघितलें व त्यांच्या स्थितीचा विचार केला, तेव्हां मला माझ्या भितेरपणाची लाज वाटली. डोळ्याचीं आसवें पुसून थोडा धीर धरला. इतक्यांत माझे मित्र आले व आम्हीं दोघेहि नांवेवर बसून जहाजाकडे चाललों. जहाजावरील कप्तानानें आमच्याशीं अधिकच निर्दयतेचें वर्तन केलें. त्यानें आम्हांस एका अंधाऱ्या खोलींत बसावयास जागा दिली. त्या खोलींत वारा खेळत नव्हता, व प्रकाशही मुळींच नव्हता. आम्हीं तक्रार केली, तेव्हां कप्तानानें आम्हांस कळविलें, " दुसऱ्या खोल्या रिकाम्या नाहींत. तुम्हांला ह्याच खोलींत निर्वाह करावा लागेल." उलट ज्या एकदोन युरोपीयन इसमांनीं डेकचे

टिकिटें (तिसरा वर्ग) घेतलीं होतीं त्यांस दुसऱ्या वर्गातील एक चांगली खोली दिली. असो. आम्हांस ह्यावर कांहींच करतां येण्यासारखें नव्हतें.

आतां प्रवासाचें वृत्त ऐका. पहिल्या दिवसाची रात्र अत्यंत हालअपेष्टांत गेली. सर्व रात्र बसून काढावी लागली. ह्या दिवसांत फार उकडत असे. हुगळी-मध्यें दोन दिवस अधिक काढावयाचे होते. जेव्हां जहाज हुगळीच्या समुद्रांतून बाहेर पडून बंगालच्या उपसागरांत शिरलें, तेव्हां समुद्रानें आपलें उग्र स्वरूप दाखविण्यास सुरवात केली. कारण, हे दिवस वर्षा कालांतील समुद्राचे यौवना-वस्थेचें दिवस होते. अर्थात् जहाज डोलायला लागलें. मोठमोठ्या लाटा समु-द्रांत उत्पन्न होऊन प्रवाशांशीं हस्तांदोलन करण्याकरितांच कीं काय, त्यांच्या जवळ जात होत्या. केवळ हस्तस्पर्शावरच संतुष्ट न राहतां त्या लाटा प्रेमानें प्रवाशांना समुद्रस्नानहि करावयास लावीत होत्या. आम्हीं दुसऱ्या मजल्यावर असल्यामुळें आम्हांस विशेष त्रास झाला नाहीं. परंतु शीखांवर ही एक आपत्तीच येऊन पडली. त्यांचें सर्व कपडे भिजून गेले. त्यांच्या जवळचे पीठही पाण्यानें खराब झालें. दिवसा चैन नाहीं, रात्री झोंप नाहीं, अशा हलाख स्थितींत ते बिचारे पडले होते. माझ्या मित्रानेंही कांहींच खाल्लें नाहीं. तो ह्या दिवसांत स्वस्थ पडून होता. मी आपल्याबरोबर मीठाचे व लिंबाचे कांहीं रुचकर पदार्थ घेतले होते. ह्या पदार्थांचा मला फारच उपयोग झाला. कारण, जेव्हां समुद्र क्षुब्ध होतो व जीव मळमळायला लागतो, तेव्हां मीठाचे पदार्थ खाल्यानें किंवा लिंबाचें लोणचें चाखल्यानें मळमळ दूर होतें; यामुळें माझी प्रकृती चांगली राहिली व मी आपल्या मित्राची शुश्रूषा करीत होतों. चारपांच दिवसानंतर समुद्रानें शांत स्वरूप धारण केलें व आम्हीं पीनांगच्या खाडीजवळ पोहोंचलों. आतां, जहाजावरील प्रवासाच्या सुखाचा अनुभव येऊं लागला. समुद्रावर हीं छोटीशीं आगबोट इतक्या संथपणें चालत होती कीं, जणुं काय पाण्यावर बदक तरंगत आहे. संध्याकाळीं जेव्हां भगवान् सूर्य नारायण अस्तास जाई तेव्हां तर क्षितिजावरील दृश्य अधिकच मनोहर दिसत असे. सोनेरीं किरणें पाण्यावर पड-ल्यावर त्यांचें निरनिराळ्या रंगात पृथक्करण झालेलें दिसून येई. हे दिवस आमचे इतके आनंदांत गेले कीं, आम्हीं मागील चार दिवसांचे सर्व दुःख विस-रून गेलों. आम्हीं सर्व दिवस डेकवर बसण्यांत, पुस्तकें वाचण्यांत व पत्ते खेळ-

ण्यांत घालवीत असूं. दुपारीं मी शीख बंधूंची चवकशी करण्याकरितां त्यांच्याकडे गेलों. ते देखील मागील दिवसांचे दुःख पार विसरून आनंदांत चूर असलेले मला आढळले. त्रास इतकाच कीं, त्यांना डेकवर शेळयामेंढ्यांप्रमाणें खचून भरण्यांत आलें होतें; व जहाजावरील नावाडी त्यांच्याशीं निर्दयपणें वर्तन करीत असत. ह्याहून विशेष गोष्ट ही कीं, त्यांना मेंढ्याच्या विष्टेच्या दुर्गंधींतच सदासर्वकाळ राहवें लागे. त्यांचें सर्व सामान पाण्यानें खराब झालें होतें कित्येक पदार्थ तर समुद्रांत वाहूनहि गेलें होते,व कित्येकांचे कपडे तर अजून ओलेच होते ज्यांच्याजवळ झोल्याची शय्या ( Hammock-bed ) होती, त्यांस फार आराम झाला. ते झोंप तरी घेऊं शकत. ह्या करितां डेकवर प्रवास करणाऱ्यांनीं झोल्याचें आंथरुण अवश्य जवळ बाळगावें. असें केल्यापासून प्रवासांत फार आराम असतो. जहाजावर मागितल्यानें कोणतीहि वस्तु मिळूं शकत नाहीं. आपली वस्तु असेल तरच वेळेवर काम देईल.

सरतें शेवटीं हालअपेष्टा सोसून व जहाजावरील प्रवासाच्या सुखाचाही मधून मधून अनुभव घेत, आम्हीं एकदांचें पीनांगाला पोहोंचलों. आगबोट सकाळीं पीनांगाला पोंहोंचलीं. आज आकाश निरभ्र असून प्रातःकाळचा देखावा फारच आल्हादकारक होता. स्टीमर बंदराच्या एका बाजूस किनाऱ्यापासून कांहीं अंतरावर उभी राहिली, व पीनांग बंदरावर उतरणाऱ्या प्रवाशांकरितां लहान लहान नांवा जहाजा जवळ येऊं लागल्या. आम्हीं तर उतरण्याच्या तयारीनें केव्हांपासूनच नांवेची प्रतिक्षा करीत होतों. जहाजावरील नोकराला थोडेबहुत बक्षीस दिलें; व आपल्या कर्तव्यातून मुक्त झाल्यावर आम्हीं आपले सामानासह एका नावेंत बसलों व नांव किनाऱ्याकडे चालूं लागली.

पीनांग हे स्ट्रेटसेटलमेंटमधलि एक फार सुंदर शहर आहे. ह्या शहराची रचना निराळ्याच प्रकारची आहे. अशा रचनेचे शहर पाहण्याचा प्रसंग मला ह्यापूर्वी कधींच आला नव्हता. सुंदर व साफ सूफ केलेल्या गल्ल्या व त्यावरून इकडून तिकडे धांवणाऱ्या ' जिनरक्षा ' नजेरस पडत होत्या. आम्हीं पूर्वी केव्हां जिनरक्षाचें वाहन पाहिलें नव्हतें. तव्हां स्वाभाविकपणेंच ह्या वाहनावर बसण्याचीं आम्हांस इच्छा झाली. एका जिनरक्षेवर मी बसलों व दुसऱ्या जिनरक्षेवर माझे मित्र स्वार झाले. ह्याच जिनरक्षांवर आपआपलें सामान लादून आम्हीं

पुढें चाललों. लांब शेंडी असलेला चीनी मनुष्य रिक्षा ओढीत पळत असतांना पाहिला म्हणजे फार मौज वाटते. आपल्या देशांत मेमसाहेबांच्या गाड्या ओढणाऱ्या किरानी बाया व इतर हिंदु इसम बरेच पाहण्यांत येतात. परंतु त्यांना पाहून आपलें अंतःकरण केव्हांही करुणेनें द्रवत नाहीं.किंबहुना अशा हीन स्थितींत दिवस काढणें आपल्या लोकांस एक सामान्य गोष्ट वाटतें. मनुष्य स्वभावच असा आहे कीं, स्वतःस मोठा समजणारा इसम दुसऱ्यांच्या हिताकडे लक्ष देऊं शकत नाहीं. म्हणूनच तर आपल्या बांधवांची अशी दुर्दशा आहे.

वाचकहो, चला आपण पीनांगच्या गल्लयांतून जिनरक्षांमधून हिंडून येऊं. बाजारांतील दुकानांच्या दोन्हीं बाजूकडील उंच उंच इमारतींच्या रांगाकडे बघत आम्हीं शीखांच्या--गुरुद्वार--ठिकाणाकडे चाललों. रस्त्यांत ठिकठिकाणीं शीख शिपाई दिसत होते. त्यांची उंच शरीरयष्टि व लांब लांब दाढया भारत देशाच्या मोठेपणाला शोभणाऱ्याच होत्या. त्याबरोबरच मनाला असेंहि वाटत होतें कीं, हे भारत मातेचे सुपुत्र येथें अशा स्थितींत कां बरें उभें राहिलें! असा विचार मनांत आला कीं, मनाला फार वाईट वाटे. परंतु भवितव्यतेपुढें कोणाचा इलाज चालणार? सद्यःस्थितीचा संबंध व्यक्तिसमुदायाशीं असल्यास व्यक्तिला स्वतःच्या इच्छेप्रमाणें सर्व समाजाचीं परिस्थिति एकदम कशी बदलवितां येईल?

आतां आम्हीं शीख मंदिरांत पोहोंचलों. पीनांग शहरांतील हे मंदिर शीखांचे खरोखरींच एक जिवंत स्मारक आहे. जी माणसें हिंदुस्थानांतून इकडे येतात, जे नोकरी मिळविण्याच्या खटपटींत असतात किंवा नोकरी सुटल्यामुळें ज्यांना नोकरीची गरज असते, असे सर्व लोक ह्याठिकाणीं येऊन मुक्काम करतात. चांगली पक्की इमारत, मजबूत सुंदर फरशी व मोठमोठीं दालनें ह्यांचा प्रवाशांना विश्रांतिकरतां चांगलाच उपयोग होतो. येथील ग्रन्थी ( धर्मगुरु ) फारच सज्जन गृहस्थ आहेत. आम्हांस त्यांनीं फार चांगल्या रीतीनें वागविलें.आमच्या खाण्या-पिण्याची त्यांनीं चांगली व्यवस्था केली. आम्हीं तीन चार दिवस येथेंच होतो. माझ्या मित्राजवळ अमेरिकेस जाण्याकरतां पुरेसे पैसे होते म्हणून त्यानें सिंगा-पूरला जाणाऱ्या आगबोटीचें टिकीट काढलें व मला एकटें मागें टाकून तो पुढें निघून गेला. मी मनाशीच म्हटलें " आपण जरी मला सोडलें तरी, ईश्वर मला

खास सोडणार नाहीं.'' असो. अशा प्रकारें मी आपल्याच विचारांत चूर होऊन गेलों. एका पंजाबी मित्रानें मला मदत करण्याच वचन दिलें होतें, म्हणून त्याचे-बरोबर मी 'ईंपू'ला गेलों. तेथेंहि आपले लोक बरचे आहेत. बहुतेक सर्व शीख आहेत. त्यांपैकीं बरेंच फौजेंतील शिपाई असून कांहीं वॉचमनचें काम करणारे आहेत. ह्याशिवाय कांहीं हिंदी इसम काबाडकष्ट व मजुरी करून पैसे मिळ-वितात. हे बंदर इंग्रजांचे ताब्यांत आहे. येथील मूळ रहिवाशांस 'मलाई' असें म्हणतात. ते बहुतांशीं मुसलमान असून आपल्या धर्माचे कट्टे अभिमानी आहेत. परंतु हे लोक पंजाबच्या लोकांप्रमाणें उद्योगी नाहींत. ह्याच कारणामुळें त्यांचा राज्यकारभार करण्याचें काम पर प्रांतीय लोक बळकावून बसले आहेत. ह्या बेटांत चीनी लोकहि पुष्कळ आहेत. शिवाय दक्षिण हिंदुस्थानांतील कलिंग लोकहि आहेत. कलिंग हा शब्द killing ह्या इंग्रजी शब्दाचा अपभ्रंश आहे. खूनाच्या अपराधाकरितां ज्या हिंदी गुन्हेगारांना हद्दपारीची शिक्षा होत असे, त्यांना येथें पाठविण्यांत येत असे. ह्याविषयीं एक दंतकथा सांगण्यांत येते. कोणा एका मलाई माणसानें गोऱ्या माणसाजवळ हिंदी गुन्हेगारासंबंधी विचार-पूस केली, तेव्हां त्यांनीं सांगितलें, "they killing men" ह्यावरूनच ह्या लोकांना 'कलिंग' असें म्हणण्यांत येऊं लागलें. हे लोक पीनांगमध्यें अधिक प्रमाणांत असून तेथें त्यांचे एक धर्म मंदिरही आहे. ह्या मंदिरांत ते आपली पूजाअर्चा करीत असतात.

मी आपल्या मित्राबरोबर तेथें (ईंपूला) गेलों खरा. परंतु मला कांहीं विशेष लाभ झाला नाहीं. इकडे तिकडे फिरावयास मिळाल्यामुळें भारतीय बांधवांची स्थिति अवलोकन करण्याची संधि मात्र चांगली मिळाली. त्यापैकीं बरेचसें फौजेंतून नोकर होते. कांहीं लोक गाई विकत घेऊन दुधाचा व्यापार करतात व कांहीं दुकानें चालवितात. सांगावयाचें इतकेंच कीं, भारतीय लोक परिश्रम करून येथें राहिले असून श्रमाचे फळहि त्यांस येथें उपभोगावयास सांपडतें. येथील हवा-पाणीहि उत्तम आहे. आगगाडींतून प्रवास करीत असतांना जंगल व पहाडांचे नयन मनोहर दृश्य आम्हांस पहावयास सांपडलें. हे देखावे पाहून आमची मनें सुप्रसन्न झालीं. ईपूहून जेव्हां मी आपल्या मित्राच्या गावीं परत आलों तेव्हां माझी एका शीख विद्यार्थ्यांशीं भेट झाली. तो देखील अमेरिकेस जाणार होता.

त्याचें नांव पालासिंह असें होतें. आपल्या भावापासून पुरेसें पैसे घेऊन माझ्या-बरोबर तो पीनांगला आला. आतां आम्हीं फिरून दोघे झालों. स्टीमर कंपन्या पीनांगपासून सिंगापूरचें १२ डालर भाडें घेतात. इकडे प्रवास करणाऱ्यांनीं सर्व स्टीमरांचे भाड्याचे दर सारखें नसतात, हें लक्षांत ठेवावें. कारण तेंच टिकीट चीनी व्यापाऱ्यांनीं आम्हांस फक्त ४॥ डालरला दिलें. म्हणून चांगली विचार-पूस करून टिकीट घेत असावें.

असो. ठरलेल्या दिवशीं आम्हीं सिंगापूरला जावयास निघालों. ह्या स्टीमरवर चीनी लोकांची अतिशय गर्दी होती. त्यांच्या लांब लांब शेंड्या व घाणेरडे कपडे पाहून इतर उतारूंस त्यांची किळस येई. खाण्याच्या बाबतींत तर कांहीं विचारूंच नका. ईश्वरांनीं निर्माण केलेला कोणताही प्राणी खाण्यास हे लोक कमी करीत नाहींत. कीडे, मुंगळे, बेडूक, झुरळें, कुत्रें, मांजरी वगैरे सर्व प्राणी ते गट्ट करून टाकतात. ह्या प्राण्यांना ते इतके सडवून सडवून खातात कीं, पाहणा-ऱ्याच्या अंगावर शहारे येतात. आम्हीं चार दिवस भयंकर हालअपेष्टांत काढलें. कारण ह्यावेळीं आम्हीं डेकवरीलच प्रवाशी होतों. आमच्याबरोबर इतरही हिंदी मनुष्य होते, त्यांसही फार कष्ट सोसावे लागलें. खरोखर ही एक प्रकारची नरक-यात्राच आहे. माझें सर्व प्रवाशांना असें सांगणें आहे कीं, त्यांनीं शक्य तोंवर इंग्रजी कंपन्यापासून अलिप्त असावें. जर्मन व जपानी आगबोटी इतक्या वाईट नसतात. ह्या आगबोटींतून डेकच्या प्रवाशांची देखील चांगली सोय होते.

सिंगापूरला आमची आगबोट पोहोंचली. बोटीतून उतरून आम्हीं गुरु-द्वाराच्या ठिकाणीं गेलों, परंतु तेथें शेजारींच एक हिंदी गृहस्थ आपल्या कुटुं-बासह राहत असतात, असें आम्हास कळलें. म्हणून त्यांच्याकडे जाणें आम्हांस इष्ट वाटलें. त्यांच्याकडे गेल्यापासून आम्हांस फार आनंद झाला. त्यांनीं मोठ्या प्रेमानें आमचे स्वागत केलें व आम्हांस रहावयास जागा दिली. एक आठवडा आम्हीं त्यांच्याकडे राहिलों; व नंतर हांगकांगला जाण्याची तयारी केली.

येथें मला आणखी एक गोष्ट सांगितली पाहिजे. ह्या हिंदी गृहस्थांनीं कित्येक हिंदी गृहस्थांकडून मला मदत मिळवून देण्याच्या कामांत पुष्कळ खटपट करून पाहिली. तेथें मी दोनतीन व्याख्यानेंही दिली. ती लोकांना फार आवडली. येथें लांबच्या प्रवासांत उपयोगीं पडणाऱ्या लहान लहान वस्तू मी खरेदी केल्या.

केंस विंचरण्याची फणी, ब्रश, टूथ ब्रश, वस्तरा, साबण व अशाच नित्य उपयोगीं पडणाऱ्या वस्तु विकत घेतल्या. ज्या दिवशीं जावयाचें होतें,त्याचे आदले दिवशीं आम्हीं सिंगापूरच्या घाटावर गेलों होतों. तेथें कित्येक जहाजें आमच्या नजेरस पडलीं. सिंगापूर हे एक मोठें बंदर असल्यामुळें जगांतील सर्व बाजूंकडून येणारीं जहाजें येथें येऊन थांबतात. हें एक लहानसें बेट असून ह्याच्या एका बाजूस चीन व जपान, व दुसऱ्या बाजूस हिंदुस्थान आहे. मोठमोठ्या देशांच्या मध्यभागीं असलेलें हे एक नाक्याचें ठिकाण आहे. सिंगापूरमध्यें सर्व देशांतील लोक दृष्टीस पडतात. अर्थात् येथील लोकवस्ती संमिश्र ( Cosmopolitan ) स्वरूपाची आहे.

ह्यावेळीं आम्हीं जर्मन कंपनीचे टिकीट विकत घेतलें. ह्यामुळें सिंगापूरपासून हांगकांग पर्यंतच्या प्रवासांत आम्हांस मुळींच त्रास झाला नाहीं. परंतु चीनी भुतें ह्या जहाजावरहि होती. एकदां त्यांच्याशीं झटपट करण्याचाहि प्रसंग मजवर आला. तो प्रसंग असा—मी आपले अंथरूण जेथें ठेविलें होतें, तेथें चार पांच चीनी मजूर आपल्या गुडगुड्या घेऊन आले व अफूचे धूम्रपान करावयास बसले. त्या धूराच्या दुर्गंधीनें माझे डोकें फिरावयास लागलें. त्यांना तेथून दुसरी कडे जाण्यास मी सांगून पाहिलें, परंतु त्यांनीं माझ्या सांगण्याप्रमाणें करावयाचे सोडून उलट, चीनी भाषेंत ते ' घाँ घाँ ' करूं लागलें. ज्याप्रमाणें एक कावळा कांव कांव करूं लागला म्हणजे इतर कावळे त्याचेजवळ येऊन कांव कांव करावयास लागतात, त्याप्रमाणेंच पुष्कळसे चीनी मजूर येथें जमलें व ओरडूं लागले. माझ्या मनांत आलें कीं, चारपांच मजुरांच्या शेंड्या धरून त्यांस चांगला चोप द्यावा. परंतु माझे मित्र पालासिंह यांनीं मला तसें करूं दिलें नाहीं. म्हणून कप्तानाकडे जाऊनच ह्या बाबीचा निवाडा करविण्याचें मी ठरविलें. चीनी मजूरांपैकीं एका मजूरास इंग्रजी येत होतें. त्याला जेव्हां माझा विचार समजला, तेव्हां ते सर्व तेथून दुसरीकडे गेले, व मी आपलें आंथरूण नीटनेटकें करून झोंपण्याची व्यवस्था केली.

सिंगापूरहून हांगकांगला जाण्यास सहा दिवस लागतात. हा प्रवास चीनी समुद्रांतून करावा लागतो. हा समुद्र फार धोकेबाज आहे. ह्या समुद्रांत मोठमोठीं

तुफानें उठतात. परंतु ईश्वरकृपेनें विशेष हेलकावे न खातां आमचे जहाज हांगकांगला सुखरूप पोहोंचलें; व आम्हांस विशेष त्रास झाला नाहीं.

वाचकहो, चला आतां आपण हांगकांगची खाडी पहाव्रयास जाऊं. येथील देखावा खरोखरच पहाण्यालायक आहे. एका पहाडावर हांगकांग शहर बसविलेलें आहे अर्धचंद्राकार खाडीमुळें तर ह्या शहराला फारच शोभा आली आहे. मोठमोठीं जहाजें, लहान लहान नांवा, व चीनी डोंगे खाडींत इकडून तिकडे जात असतां, देखावा फारच सुंदर दिसतो. शहरांतून खाडींच्या दुसऱ्या किनाऱ्यावर जाण्याकरितां लहान लहान बोटी नेहमीं सज्ज असतात. ह्या बोटींवरून मजूर व नोकर लोक जात येत असतात.

आमचे जहाज खाडीच्या मध्यभागीं आल्यावर मी सभोंवार पाहूं लागलों, तेव्हां हांगकांगमधील अर्धचंद्राकार रांगेंतील सुंदर सुंदर इमारती पाहून मला बनारसचें स्मरण झालें, व परमपवित्र भागीरथी नदीला मनांतल्या मनांत अनेक नमस्कार करून आम्हीं बंदरावर उतरण्याच्या तयारीनें बसलों. नांवावाले जहाजावर आले.तेव्हां एका नांववाल्याशीं ठराव करून आम्हीं सरळ शहरांत गेलों.येथें नाणें दुसऱ्याच प्रकारचें असतें.सिंगापूरचें किंवा मलाई 'डालर' येथें चालत नाहींत. दुसरे नाणें जवळ असल्यास नांववाले फार त्रास देतात.नांवेंतून उतरल्यावर आपले सामान एका गाडींत घालून शीख गुरुद्वारांकडे आम्हीं चाललों. ही गुरुद्वारांचीं ठिकाणें गरीब प्रवाशांकरितां फारच सुखकारक असतात. एरव्हीं बेमाहितगार मनुष्य कोणाच्याहि झापडींत सांपडून फसण्याचा व लुटला जाण्याचा बराच संभव असतो. गुरुद्वारांत पोंहोंचल्यावर, आम्हीं आपलें सामानसुमान तेथें ठेऊन, प्रथम तेथील ग्रंथीची भेट घेतली. ग्रंथींनीं आम्हांस चांगल्या रीतीनें वागविलें. कलकत्त्याहून मजबरोबर निघालेला मित्र तेथेंच आहे, हें हांगकांगला पोहोंचल्यावर मला कळलें. ईश्वरी अवकृपेंमुळें संकटांत सांपडल्यामुळें त्याला पुढें अमेरिकेस जातां आलें नाहीं. चार पांच दिवस आम्हीं गुरुद्वारांतच राहिलों. हा वेळ पावेतों अमेरिकेस जाणारे कित्येक हिंदी विद्यार्थी हांगकांगला येऊन थांबले होतें, आतां तर अमेरिकेस जाणाऱ्या हिंदी विद्यार्थ्यांची एक टोळीच बनली. माझे मित्र पालासिंह व रवि व इतर हिंदी विद्यार्थी अमेरिकेस जावयास तयार झाले. त्यांनीं आपआपलीं टिकीटें काढून सर्व तयारीहि केली. मी बापडा फिरून एकटांच मागें

राहिलों कारण माझे जवळ अमेरिकेस जाण्यापुरतें पुरेसें पैसे नव्हतें. ज्या दिवशीं ही सर्व मंडळी हांगकांग सोडून गेली,त्या दिवशीं माझ्या मनाला मुळींच स्वस्थता नव्हती. सारा दिवस मी आपल्या खोलींत पडून होतों. एका वेळीं एक विचार करावा,दुसऱ्या वेळीं दुसराच.कोणत्याच गोष्टीचा निश्चय असा होत नव्हता.प्रथम असा विचार केला कीं, पहिलें सयामला जावें, व तेथें थोडेबहुत पैसे मिळाल्यावर अमेरिकेस जावें. असा विचार करून सयामचें टिकीट काढण्याकरितां मी टिकीट ऑफिसांत गेलों. परंतु कांहीं कारणामुळें त्या दिवशीं सयामकडील टिकीटेंच बंद होतीं. अशा प्रकारच्या अनिश्चित स्थितींत माझे कित्येक दिवस निघून गेले. माझ्याजवळ मनींलाला ( फिलिपाईनची राजधानी ) जाण्यापुरते पैसे होते. तेव्हां मी शेवटीं मनीलास जाण्याचें निश्चित केलें. मजजवळ मनीलास जाण्यापुरते पैसे नसते, तरी तितकें द्रव्य मला हांगकांगच्या एकदोघां मित्रांकडून मिळूं शकलें असतें.

मनीला हें शहर फिलीपाईन बेटांची राजधानी आहे. ह्यामध्यें अनेक बेटांचा अंतर्भाव होत असून हीं फिलीपाईन बेटें अमेरिकन सरकारच्या अमलांखालीं आहेत. येथें प्रथम स्पेन लोकांचें राज्य होतें. परंतु स्पेन लोकांनीं फिलीपाईन लोकांवर फार जुलूम व अत्याचार केले. ह्यामुळें फिलीपाईन लोक स्पेन लोकांशीं असंतुष्ट असत. जोंपर्यंत दैव प्रतिकूल होतें, तोंपर्यंत ते तरी बिचारे काय करणार ? कालांतरानें दैवाचा फेरा त्यांना अनुकूल झाला. अमेरिकेचें ' मेन ' नांवाचें जहाज स्पेन लोकांच्या चुकीनें समुद्रांत बुडालें. ह्यावरून स्पेन व अमेरिका ह्यामध्यें युद्ध जुंपलें. युद्धांत अमेरिकेचा जय होऊन फिलीपाईन बेटें अमेरिकेनें घेतलीं. तेव्हां पासून फिलीपाईन लोकांचे भाग्यहि उदयास येऊं लागलें.

आतां मनीलाचें वृत्त ऐका. मनीलामध्यें उतरण्यास मला कांहींच त्रास झाला नाहीं. माझी दृष्टि थोडीशी मंद आहे तरी तिचा कोणत्याही रोगाशीं संबंध नसल्यामुळें मला तेथें उतरण्याचें बाबतींत प्रतिबंध करण्यांत आला नाहीं. शिवाय माझ्याजवळ दाखविण्याकरितां पुरेसें पैसेहि होते. मनीलास पोहोंचल्यावर निराळा उद्योग करून पैसे मिळविण्याचें मी ठरविलें;व त्याप्रमाणें मनीलाच्या वर्तमानपत्रांमध्यें धार्मिक विषयावर लेख लिहावयास मीं सुरुवात केली; व अशा प्रकारें धर्मप्रचाराच्या कार्याला आरंभ केला. पाहिल्या चारपांच महिन्यांत मला कांहीं फायदा

झाला नाहीं. इकडे तिकडे नोकरी करून हे दिवस मी कसे तरी काढले. जे मजजवळ थोडे पैसे होते तेही सर्व खर्च झाले, व मी अगदींच कफल्लक बनलों. परंतु 'केलेल्या कर्माचें फळ मिळतेंच मिळतें' ह्या उक्तीचा अनुभव मलाहि आला. माझे वर्तमानपत्रांतील लेख वाचून एका अमेरिकन गृहस्थास मला आपले जवळ कांहीं दिवस ठेऊन घेण्याची इच्छा झाली. त्यानें मला पत्र पाठवून आपलेजवळ येऊन राहण्याची विनंति केली. त्यापूर्वींच मी कामाच्या चवकशीकरितां उलंगापोला गेलों होतों; व एका ठेकेदाराच्या हाताखालीं मजुरी करून आपला कसाबसा निर्वाह करीत होतों. अमेरिकन गृहस्थाचें पत्र पोहोंचतांच मी मनीलास परत गेलों, व त्या अमेरिकन गृहस्थाची-मिस्टर स्कॉटची-भेट घेतली. माझे श्रमाचें चीज होऊन त्यानें मला संस्कृत शिकविण्याकरितां आपल्या घरीं ठेवलें. त्यांनीं ह्याचा मोबदला म्हणून मनीलापासून शिकागोपावेतों टिकीट काढून देण्याचें कबूल केलें. तीन महिने मी त्या गृहस्थाजवळ राहिलों व त्याला व्याकरण व दोनतीन उपनिषदें शिकविलीं. हे दिवस माझे फार सुखांत गेले. कारण रोज स्वाध्याय घडून शास्त्रांवर विचार करण्यास अवसर मिळाला व त्यायोगेंकरून मनांस शांतिहि मिळाली.

तीन महिने लोटल्यावर मिस्टर स्कॉटनीं मला तिकिट काढून दिलें, व मी हांगकांगला रवाना झालों. आतां मी मनीलाहून अमेरिकेला जात असल्यामुळें मला फिलीपाईन लोकांचे अधिकार प्राप्त झाले ! अर्थात् मला डॉक्टरांच्या तपासणीचा फारसा त्रास झाला नाहीं. ज्या जहाजावरून मी व्हॅंकोव्हरला जात होतो त्यावरून बरेच पंजाबी इसमहि जात होते.

हें जहाज कॅनेडियन पॅसिफिक कंपनीचें होतें. ह्या जहाजावरून पुष्कळसे प्रवासी अमेरिकेस चालले होतें. ज्या दिवशीं आम्हीं आपलें सामान घेऊन जहाजावर बसण्याकरितां हांगकांग 'व्हार्फ'वर गेलों, त्या दिवशीं तेथें पुष्कळ जहाजें उभीं होतीं. हांगकांग हें एक मोठें बंदर असून इंग्रजांनीं एक शिबंदी तेथें ठेविली आहे. जगांतील बहुतक सर्व देशांतील लोक येथें दिसून येतात. हें शहर पाहण्यालायक आहे. येथें विजेच्या गाड्या चालतात. एका अत्यंत उंच व सरळ कड्याच्या डोंगरावर जाण्याकरितां एका विजेच्या गाडीची योजना करण्यांत आली आहे. ही गाडी जवळ जवळ लंब मार्गानें सरळ टेंकडीवर जाते.

ह्या गाडींत बसलें असतां आनंद वाटतो व थोडें भयहि वाटतें. ह्या गाडीच्या योजनेंत स्थापत्यशास्त्रांतील बरेंच कौशल्य दिसून येतें.

ज्या वेळीं आमची नाव जहाजाजवळ पोहोंचली व आम्हीं शिडीवरून जहाजावर चढूं लागलों, तेव्हां जहाजावरील नांवाड्यानीं जहाजावरील मोऱ्यांतील घाणेरडें पाणी दुष्टपणानें आमच्या अंगावर सोडलें.त्या घाण पाण्यानें ओलें झाल्यावर, आम्हीं वर जाऊन पोहोंचलों व आपआपली निजण्याबसण्याची व्यवस्था केली. हांगकांगपासून व्हॅंकोव्हरला जाण्यास सुमारें २८ दिवस लागतात. ह्याकरितां जहाजवाल्यांनी डेकच्या प्रवाशांस निजण्याकरितां खालच्या भागांत एक एक माणसांस निजतां येईल अशा लांकडी फळ्या ठेविलेल्या होत्या. अशीच व्यवस्था बहुधा सर्व जहाजांवर असतें.

आमचें जहाज हालूं लागलें व आम्हीं हळू हळू हांगकांगपासून दूर दूर जाऊं लागलों. शॅंघाईपर्यंत प्रवाशांची संख्या वाढली नाहीं. परंतु कोबे व योकोहामा येथें बरेचसे जपानी प्रवासी आमच्या जहाजावर चढले. हें डेकवरील उतारूं होतें तरी त्यांचे पोषाख स्वच्छ व नीटनेटके होते. डोक्यावर अमेरिकन टोप्या घातल्यामुळें सभ्य गृहस्थांत त्यांची गणना झाली होती. एकीकडे आमचे लोक मळलेले व घाणेरडें कपडे घालून अमेरिकेस चालले होते, व दुसरीकडे जपानी मजूर अमेरिकन पोशाखांत द्रव्यार्जनाकरितां अमेरिकेस जात होते. हा देखावा पाहून मला फार वाईट वाटलें. कारण जपानी मजूरांची वागणूक एखाद्या उन्नत जातीला साजेशीं होती व आपल्या शत्रूकडूनही ते वाखाणले जाण्यास सर्वथैव योग्य होते. ह्याच्या उलट, आमच्या मजूरांकडे पाहून मनांत किळस उत्पन्न होई;व किळस तरी कां न यावी? ह्याच कारणामुळें तर आमची सर्व जगांत छीः थूः होतें. आळसानें आमच्या सर्व कार्यांत एक भयंकर विघ्न उत्पन्न करून ठेविलें आहे. ह्याच जहाजावर तीन देशांचे-भारत, चीन व जपान ह्या देशांचे-मजूर होतें. विचारी माणसांस ह्या तीन देशाची स्थिति समजून घेण्यास येथें जहाजावरच साधन सामुग्री होती. भारतीय मजूरांकडे पाहून आम्हीं जगांतील सुधारलेल्या देशाच्या किती तरी मागें आहोंत असें वाटे. जहाजावर सर्व चाळीसच हिंदी मजूर होते. परंतु ते सर्व आपला वेळ भांडण, तंट व मद्यपान अशा वाईट कामांत घालवीत होतें.परस्परांविषयीं प्रेम व सहानभूति त्यांच्यात मुळींच नव्हती

त्यांच्यामध्यें एकी हा देखील गुण नव्हता. एखाद्या वेळीं दोनचार हिंदी मजूरांना इतरांनीं खूप मार दिला तरी इतर भारतीय मजूर त्यावेळीं त्याच्या मदतीला धाऊन जात नसत. उलट तमाशा पहात उभे राहण्यांत त्यांस मौज वाटे. चिनी मजूर अफू खाण्यांत तर असत. परंतु त्यांच्यामध्यें 'एकी' हा गुण विशेषत्वानें होता. जेव्हां एखाद्या चिनी मजूरावर एखादें संकट येई, तेव्हां सर्व चिनी मजूर त्याच्या मदतीकरितां धाऊन जात. जपानी मजूरांविषयीं तर कांहीं बोलावयासच नको. त्यांच्याजवळ इंग्रजी शिकण्याची पुस्तकें होती, हें लोक इंग्रजी शिकण्यांत आपला वेळ घालवीत असत. ह्याशिवाय जिजित्सु इत्यादि जपानी खेळ खेळण्यांत रोज दोन तास घालवून ते आपलें मन रमवीत असत. संख्येनें जपानी मजूर सर्वांत अधिक होते, तरी तें सर्व शांत असून परस्परांशीं प्रेमानें वागत होते. ते कोणत्याही प्रकारें भांडण तंटे करीत नसत. हिंदी मजूरांना मद्य पिऊन धिंगाणे घालतांना पाहून जपानी मजूरांस फार वाईट वाटत असे. आमच्या कांहीं बेवकूफ बंधूनीं तर जपानी स्त्रियांशीं बोलतांना असभ्य व लज्जास्पद भाषा वापरण्यासहि कमी केलें नाहीं. त्यांचें तें किळसवाणें भाषण ऐकून मला भारीच वाईट वाटलें व मी त्यांपैकीं कित्येक बेवकूफांना चांगला चोपही दिला.

ह्याप्रमाणें आमचा एक एक दिवस जाऊन आम्हीं अमेरिकेच्या अधिकाधिक जवळ जाऊं लागलों. ह्या दिवसांत पॅसिफिक महासागर अतिशय शांत असतो. ह्यामुळें तुफान किंवा वादळ उठलें नाहीं. जहाजहि फार मोठें होतें. ह्यामुळें कधीं कधीं वारा वाहूं लागला तरी त्यापासून आम्हांस फारसा त्रास होत नसे. २८ मेला आमचें जहाज व्हेंकोव्हरला जाऊन पोहोंचलें व पुष्कळ उतारूं डॉक्टर तपासणीकरितां थांबले. ह्या बंदरावर अडाणी मनुष्यास फसविण्याच्या अनेक युक्त्या आहेत. मला कोणी कांहीं म्हटलें नाहीं. कोणाकडूनहि प्रतिबंध न होतां मी जहाजांतून उतरून सरळ शहरांत गेलों.

वाचकहो, अमेरिकेस कसा पोहोंचलों, ह्याची हकीकत येथें संपली. अधिक सूचना तद्वतच अमेरिकेच्या परिस्थितीचा विचार ह्याच पुस्तकांत ह्यापुढें करण्यांत येईल. इतकें सांगून प्रवासाची ही रामकहाणी येथेंच संपावितों.

सत्यदेव.

---

# अमेरिका-पथ-दर्शक.

## प्रश्नोत्तरें.

**प्रश्न**--अमेरिका कोठें आहे व त्या देशाला जाण्याचा मार्ग कोणता?

**उत्तर**--नवीन खंडांत 'युनायटेड स्टेट्स' नावांचा एक मोठा विस्तीर्ण देश आहे; हा देश युरोपइतका मोठा असून, ह्याचे क्षेत्रफळ हिंदुस्थानच्या दुप्पटीहून अधिक आहे. हा देश नवीन खंडाच्या उत्तर भागांत असून ह्याच्या उत्तरेस कानडा, दक्षिणेस मेक्झिको, पूर्वेस अटलांटिक महासागर व पश्चिमेस पासिफिक महासागर व ब्रिटिश कोलंबिया आहे. ह्या देशाला जाण्याला बरेच मार्ग आहेत. परंतु दोन मोठे मार्ग विशेष प्रसिद्ध आहेत. एक कलकत्त्याहून जपान, व जपानहून पॅसिफिक महासागरांतून जाऊन सॅनफ्रान्सिस्को येथें, किंवा सियेटल येथें, उतरतां येतें, तो मार्ग; व दुसरा मुंबईद्वारा युरोप व अटलांटिक महासागरांतून जाऊन न्युयार्क किंवा सियेटल येथें उतरतां येतें, तो मार्ग; व मुंबईद्वारा युरोप व अटलांटिक महासागरांतून जाऊन न्युयार्क किंवा बोस्टनला उतरतां येतें, तो मार्ग. पहिल्या मार्गानें मनुष्य अमेरिकेच्या पश्चिम भागांत जाऊन पोहोंचतो व दुसऱ्या मार्गानें अमेरिकेच्या पूर्व भागांत जाऊन पोहोंचतो.

ह्या दोन प्रमुख मार्गांशिवाय अमेरिकेस जाण्यास आणखीहि इतर मार्ग आहेत. मुंबईहून जिनोआला (इटली) जावें, तेथून फ्रेन्सिसी बंदरावरून आगगाडीनें मार्सेलिसला जावें व तेथून आगबोटीनें निघून अमेरिकेच्या दक्षिण भागांत असलेल्या गॅलवस्टन नांवांच्या बंदरावर पोहोंचतां येतें. तेथून आगगाडीनें उत्तर अमेरिकेस जातां येतें. किंवा मेक्झिकोमधील एखाद्या बंदरावर उतरून तेथून आगगाडीनें युनायटेड स्टेट्समध्यें जातां येतें. ह्या वाटेनें जाणारे विद्यार्थी गरीब असल्यास, त्यांना मेक्झिकोंत कांहीं दिवस राहून व द्रव्यार्जन करून नंतर अमेरिकेच्या संयुक्त संस्थानांत जातां येईल. मेक्झिको हा एक

चांगला सुपीक देश आहे आहे. जरी येथें अमेरिकेइतके मजुरीचें काम मिळत नाहीं, तरी येथील काम कुलीपणापेक्षां सहस्रपटीनें चांगलें आहे. ह्या मार्गानें जाणाऱ्यांनीं मुंबईहून जिनोव्यास जावें व तेथून मेक्झिकोस जाणाऱ्या आगबोटीनें मेक्झिकोला जावें. जिनोआ येथें कोणत्याहि आगबोट कंपनीच्या कचेरींत ह्यासंबंधीं सर्व माहिती मिळेल.

**प्रश्न** २—ह्या दोन मार्गांनीं जातांना वाटेंत कोणकोणतीं महत्त्वाचीं बंदरें पडतात, व कोणकोणत्या कंपनीकडून आगबोटीचीं टिकीटें काढावी लागतात?

**उत्तर**—जपानतर्फे जाऊं इच्छिणाऱ्या प्रवाशांनीं कलकत्त्यास तिकीट काढावें. जोंवर शक्य असेल तोवर इंग्रजी कंपनीपासून अलिप्त असावें. जपानी 'निपन युसेन कैसा' (Nipon Yuseu Kaisha) च्या कचेरींत टिकीट खरेदी करावें, किंवा कलकत्त्याहून हांगकांगला जावें व तेथून एखाद्या अमेरिकन कंपनीच्या जहाजावरून पुढें जावें. ह्या वाटेनें कलकत्ता, पिनांग, सिंगापूर, हांगकांग, शंघाई, कोबे, व योकोहामा हीं बंदरें लागतात. अमेरिकन कंपन्यांच्या जहाजांवरून गेल्यास होनोलुलु हें एक बंदर आणखी लागतें. योकोहामाच्या पुढें गेलें म्हणजे, आपलें जहाज नव्या जगांत शिरलें, असें भासायला लागतें. ह्या वाटेनें जाऊं इच्छिणाऱ्या प्रवाश्यांना पुष्कळ कंपन्यांच्या कचेऱ्या कलकत्त्यांत आढळणार नाहींत परंतु हांगकांगला गेल्यावर वऱ्याच कंपन्यांच्या कचेऱ्या दृष्टीस पडतात. हा मार्ग धनिक विद्यार्थी प्रवाशी व व्यापारी लोकांकरितां विशेष चांगला आहे. मजूर लोकाकरितां मात्र हा मार्ग योग्य नाहीं; मजूरांकरितां हा मार्ग जवळ जवळ बंदच करण्यांत आला आहे. इंग्रजी जाणणारा मजूर किंवा एखादा निर्धन विद्यार्थी अमेरिकन पोषाख करून अमेरिकेस जाऊं शकेल परंतु इतर मजूरांकरितां हा मार्ग बंद आहे असेंच समजावें.

युरोपच्या मार्गानें जाणाऱ्या प्रवाश्यांना मुंबई किंवा कोलंबो येथें तिकीट खरेदी करणें अवश्य आहे. कोलंबोहून टिकीट घेणें फार चांगलें, कारण तेथें पुष्कळ कंपन्यांचीं जहाजें येऊन थांबतात. Norddeutscher Lloyd (नॉर्डेटशर लॉइड) कंपनीचीं जहाजें कोलंबोहून मार्सेलीसला जातात. ह्या कंपनीचीं जहाजें मार्सेलिसहून पुढें अमेरिकेस जातात. ह्या कंपनीचें जहाज न मिळाल्यास 'Hamburg American' कंपनीच्या जहाजांतून जातां

येतें मुंबईला American Lloyd ह्या कंपनीच्या जहाजांतून पोर्ट सय्यदला गेल्यावर तेथें दुसऱ्या एखाद्या कंपनीच्या जहाजावरून अमेरिकेस जातां येईल. जोंवर शक्य होईल तोंवर इंग्रजी कंपनीचीं तिकिटें खरेदी करूं नयेत. हालंड, जर्मनी, आस्ट्रिया, अमेरिका ह्या देशांतील कंपन्यांची जहाजें बरीच असतात व ह्या जहाजांवर बऱ्याच सोई असून अपमान होण्याची भीति नसते. मी जर्मन कंपनीच्या जहाजांतून आजवर प्रवास केला असून पुढेंहि त्याच कंपनीच्या जहाजांतून प्रवास करण्याचा माझा विचार आहे.

ह्या मार्गानें कोलंबो किंवा मुंबईहून गेल्यास एडन, सुएझ, पोर्ट सैय्यद नेपल्स, जिनोआ, मार्सेलिस इत्यादि बंदरें लागतात. मार्सेलिस हें फ्रेंच बंदर आहे. त्या पुढील बंदरांचीं नांवें देणें कठीण आहे. कारण निरनिराळ्या कंपन्यांचीं जहाजें निरनिराळ्या मार्गानें जातात, व आपआपल्या सोईप्रमाणें निरनिराळ्या बदरावर थांबतात. इंग्लंडच्या एखाद्या बंदरावरून सुटणारें जहाज मात्र सरळ अमेरिकेंत जाऊन न्युयार्क, बोस्टन, फिलोडलफिया इत्यादि अमेरिकेंतील बंदरांवरच थांबते, वाटेंत दुसऱ्या कोणत्याही बंदरावर थांबत नाहीं.

**प्रश्न ३ राः**—येथून जातांना कोणाची परवानवी घ्यावी लागते काय व घ्यावी लागत असल्यास कोणाची परवानगी काढावी लागते?

**उत्तरः**—मी जातांना कोणाचीच परवानगी काढली नाहीं. परंतु मी असें ऐकतों कीं, आजकाल मॅजिस्ट्रेटची परवानगी काढावी लागते, असें असलें तरी त्यांत भीति कसली? कोणीहि विचारी सद्गृहस्थ समुद्रप्रवासाला कसा बरें विरोध करील? दुसरें असें कीं, परवानगी घेऊन ठेविल्यानें आणखी एक फायदा होतो. परदेशांत आपली ओळख पटविण्यास यामुळें सोपें जातें. एखाद्या अधिकाऱ्याची व सभ्य गृहस्थाची शिफारस असल्याशिवाय पोस्टांतून पत्रेंहि मिळत नाहींत. म्हणून विद्यार्जनेच्छु विद्यार्थ्यानें असें शिफारस पत्र घेतल्या-पासून कांहींच नुकसान नाहीं. सर्टिफिकेट शिवायही कांहीं विद्यार्थी जातात, अर्थात् त्यांचे दिवस पत्रांशिवाय काळजी न करतां जातात. मजजवळ कोणाही गृहस्थाचें शिफारस पत्र नव्हतें. अशा स्थितींतच मी सर्व जग फिरून आलों.

**प्र० ४ था**—कोणत्या दिवसांत येथून प्रवासास निघणें योग्य होईल?

**उत्तर**—जे लोक अमेरिकेस केवळ चैनीखातर जातात व ज्यांचेजवळ खर्चा-करितां पुरेसें पैसे आहेत त्यांनीं अमेरिकेस हव्या त्या दिवसांत जावे. त्यांना

सर्व ऋतु सारखेच आहेत. जे लोक विद्यार्जनाकरितां जाऊं इच्छितात व ज्यांचे जवळ खर्चण्याला पुरेसें द्रव्य असतें त्यांनीं आगस्टच्या पूर्वीच येथून निघावें, म्हणजे सप्टेंबरमध्यें अधिवेशनाला सुरवात होण्यापूर्वी तेथें जाऊन पोहोंचतां येईल. कारण, अमेरिकन युनिव्हर्सिट्यांचा वर्षारंभ सप्टेंबर अखेरपासून होतो. ज्यांना दुसऱ्या सहामाहींत अभ्यासास सुरवात करावयाची आहे, त्यांनीं येथून डिसेंबरमध्यें निघून तेथें जानेवारींत पोहोंचलें पाहिजे. परंतु असें करणें योग्य नाहीं. वर्षारंभापासूनच युनिव्हर्सिटींत दाखल होणें विशेष सोईचें असतें.

ज्यांना शिकागो विश्वविद्यालयांत प्रवेश हवा असेल, त्यांनीं येथून नोव्हेंबर, मे, किंवा आगष्टमध्यें प्रवासास आरंभ करावा, कारण, तेथें त्रैमासिक अधिवेशनाची ( Quarter Session system ) पद्धति अमलांत आहे. दर तिमाहीला तेथील अभ्यासपत्रक बदलतें; व बाराही महिने अभ्यास सुरू असतो. धनवान् विद्यार्थी हव्या त्या दिवसांत तेथें जाऊं शकतात.

जे विद्यार्थी स्वावलंबन करून विद्यार्जन करूं इच्छितात, त्यांनीं एप्रीलमध्येंच येथून जावे. ह्या योगानें मे मध्यें तेथें पोहोंचून कामाचा तपास करून द्रव्यार्जन करण्यास सुरुवात करतां येईल व सप्टेंबरपर्यंत द्रव्य मिळवून, नंतर विश्वविद्यालयांत दाखल होतां येईल. ह्या काळांत चार पांचशें रुपये सहज कामावितां येतील. असें केल्यास त्यांना अभ्यास करणें सोईचें होईल. कारण उन्हाळ्याचे दिवसांतच अमेरिकेंत द्रव्यार्जन करतां येतें. जे केवळ मजुरीकरितां तेथें जातात, त्यांनींहि एप्रीलमध्यें तेथें जावें. कारण उन्हाळयांत तेथें काम अधिक मिळते, व काम करीत असतांच अमेरिकन लोकांच्या रीतिरिवाजांशीं परिचय करून घेतां येईल. हिवाळयांत त्यांना काम न मिळालें, तरी ते उपाशीं खास राहणार नाहींत. दुसरी गोष्ट ही कीं, उन्हाळयांत खर्च कमी येतो व ही वेळहि आपल्याला सोईची अशीच असते. ह्या दिवसांत इकडे तिकडे फिरून प्रत्येक इसमाला त्याच्या पसंतीसारखे कायमचे काम मिळवितां येईल. व्यापारउदीमाकरितां जाऊं इच्छिणाऱ्यांनीं येथून आक्टोबरमध्यें जाणें योग्य होईल. कारण हिवाळयांत सर्व व्यापारी मालाच्या हंगामामुळें आपआपल्या ठिकाणीं असतात. त्यावेळीं त्यांची भेट घेणें व देणें घेणें ठरविणें हिंदी व्यापाऱ्यांस बरें पडतें. हिवाळ्याच्या दिवसांतच परदेशी व्यापारी अमेरिकेस जात असतात. ह्याच दिवसांत सर्व प्रकारच्या मालाचा घाऊक व्यापार तेथें घडत

असतो. उन्हाळ्यांत येथील धनिक लोक इकडे तिकडे हवा पालट करण्या-करितां जातात. ह्यामुळें हिंदी व्यापारी ह्या दिवसांत तेथें गेल्यास त्यांचें काम साधत नाहीं.

**प्रश्न ५ वाः**—कमी खर्चाचा मार्ग कोणता ?

**उ०ः**—हांगकांग कडील मार्गानें कमी खर्चानें जातां येतें. परंतु ह्या मार्गानें गेलेल्या कित्येक मजूरांना अमेरिकन लोकांनीं परत लावून दिलें आहे ह्याकरितां कोणाहि मजूरास ह्या मार्गानें अमेरिकेस जाण्याचा मी सल्ला देणार नाहीं. चैनी-खातर किंवा व्यापार उदीम करण्याकरितां ज्यांना तेथें जावयाचें असेल, त्यांनीं खुशाल हव्या त्या वाटेनें जावें. अमेरिकेचीं दोन्ही बंदरें सियेटल व सॅनफ्रॉन्सि-स्को त्यांच्याकरितां चांगलीं आहेत. जे हिंदीबांधव विद्यार्जनाकरितां तेथें जाणार असतील व ज्यांचे जवळ खर्चण्याला पुरेसें द्रव्य असेल, त्यांना युरोपच्या मार्गानें जाणें योग्य आहे. निर्धन विद्यार्थी हांगकांगकडून गेल्यास फार कष्ट सहन करावे लागतील, म्हणून त्यांनींहि न्यूयार्क मार्गानें किंवा गालवस्टन मार्गानें जाणें श्रेयस्कर आहे.

**प्रश्न ६ वाः**— कमींत कमी किती खर्चाची व्यवस्था लावली पाहिजे ?

**उत्तरः**—युरोपद्वारें जाणाऱ्यांना मुंबई ते न्यूयार्क भाडें साडेतीनशें रुपयें+ पडतें. व न्यूयार्क बंदरावर उतरल्यावर दोनशें रुपये दाखविण्यास लागतात. ह्या हिशोबानें साडेपांचशें रुपये एका माणसाजवळ असावयास पाहिजेत. इतक्या रकमेंत मनुष्य न्यूयार्कला पोंहोंचूं शकतो. परंतु न्यूयार्कहून अमेरिकेच्या पश्चिम भागांत जाण्यास दोनशें रुपये आणखी लागतात. ह्या करितां विचारी मनुष्यानें एक हजार रुपयांपेक्षां कमी रकम केव्हांहीं बरोबर घेऊं नये. परदेशांत जातांना केवळ जरुरी पुरतें मोजके पैसे न घेतां थोडे बहुत जास्त रकम जवळ असूं देणें हें एक व्यवहारकुशलतेचें लक्षण आहे. असें केल्यानें बराच त्रास कमी होतो. कित्येकांना अगदीं मोजके पैसे घेऊन परदेशांत प्रवास करतांना फार कष्ट सोसावे लागले. अर्थातच ज्यांनीं त्यांना मोकळ्या अंतःकरणानें परदेशीं जाण्यास

+ हल्लीं परिस्थिति बदलली आहे. प्रचलित आगबोटींचे दर २ ऱ्या परि-शिष्टांत दिले आहेत. अमेरिकन बंदरावर दाखविण्याकरितां हल्लीं १०० डॉलर ( २७५ रु. ) जवळ असावे लागतात.

उत्तेजन दिलें, त्यांस त्यांनीं मनांतून अनेक शिव्या दिल्या. सर्वच माणसें चांगल्या स्वभावाची नसतात. वीर पुरुष तर अनेक संकटें आलीं तरी घाबरत नाहींत, उलट संकटांना तोंड देणें, ते आपले कर्तव्यच समजतात. परंतु हिंदी युवकांमध्यें अद्यापि हा गुण दिसून येत नाहीं. म्हणून, अमेरिकेस जाणाऱ्या प्रत्येक युवकांस जरुरीपेक्षां अधिक द्रव्य जवळ बाळगण्याचा सल्ला मीं देईन; असें केलें म्हणजे, त्यांना स्वतःच्या पोटापाण्याची व्यवस्था लावण्याकरितां शांत वेळ मिळेल. जे हांगकांगच्या मार्गानें जाणार असतील, त्यांचें जवळ थोडे कमी द्रव्य असलें तरी चालेल. परंतु युरोपच्या मार्गानें जाणाऱ्या इसमांजवळ अधिक द्रव्य अवश्य असवयास पाहिजे; कारण तिकडे खर्च फार पडतो.

प्रश्न ७—अमेरिकन बंदरावर उतरल्यावर कोणकोणते प्रश्न विचारतात ?

उ०—ज्यावेळीं जहाज बंदरावर जाऊन उभें राहतें, त्यावेळीं सरकारी अधिकारी येऊन परदेशी प्रवाश्यांची तपासणी करतात. त्यांचे जवळ असलेलें द्रव्य पाहिल्यानंतर, पुढें दिलेले एकामागून एक असे अनेक प्रश्न विचारतात. तुम्हीं कोणत्या देशांत असतां ? येथें येण्यांत तुमचा हेतु काय ? तुम्हांस एका-पेक्षां अधिक विवाह करणें संमत आहे काय ? तुम्हांस अराजकतेचीं (Anarchism) तत्त्वें पसंत आहेत काय ? तुम्ही हे पैसे कोणाकडून कर्ज काढून आणले आहेत काय ? तुम्हांस येथें येण्याकरितां कोणी लिहिलें होतें ? तुमचा धर्म कोणता ? असेच हे प्रश्न असतात. एकापेक्षां अधिक स्त्रियांबरोबर विवाह करणें अमेरिकेंत कायद्याच्या दृष्टीनें गुन्हा आहे. म्हणून अधिक विवाह करणें संमत असणाऱ्या इसमास ह्या देशांत प्रवेश मिळत नाहीं. अराजक तत्त्वांचा प्रसाराहि ह्या देशाच्या विरुद्ध आहे. शिवाय, अमेरिकन सरकारची अशी इच्छा आहे कीं, कोणाच्या फसवेगिरीनें येणाऱ्या इसमासहि अमेरिकेंत प्रवेश मिळूं नये.

प्रश्न० ८—अमेरिकेच्या बंदरावर उतरल्यानंतर अनोळखी माणसानें काय करावें ?

उ०—अनोळखी माणसानें बंदरांत उतरल्यावर प्रथम 'यंग मेन्स ख्रिश्चन असोसिएशन'च्या (Y. M. C. A.) ठिकाणाचा तपास करावा. तेथें गेल्यावर सभेच्या चिटणीसातर्फें स्वतःच्या राहण्याचा व्यवस्था करावी. अमेरिकेंतील मोठमोठ्या शहरीं अनोळखी माणसांना फसविण्याकरतां अनेक लोक

टपलेले असतात. अशा लोकांपासून स्वतःचा बचाव करणें अवश्य असतें. यंगमेन्स ख्रिश्चन असोसिएशन करून व्यवस्था न केल्यास एखाद्या शिपायास माफक दराच्या उपहारगृहाचा पत्ता विचारावा अशा उपहारगृहांत रोज दीड रुपया किंवा ५० सेंटपर्यंत भाडें पडतें. इतकें भाडें दिल्यानें राहण्याकरितां चांगली खोली मिळूं शकते. फार तर ७५ सेंटही रोजचें खोलीचें भाडें पडेल. ह्यामध्यें जेवण्याचा समावेश होत नाहीं. मांस भक्षण न करणाऱ्या इसमानें नुसतीं फळें किंवा दूधपोळी खाऊन राहण्याची संवय करावी. जोंपर्यंत चांगलेंसे शाकाहारी उपहारगृह मिळत नाहीं, किंवा स्वतःच स्वयंपाक करून राहण्यालायक खोली मिळूं शकत नाहीं, तोंपर्यंत वरीलप्रमाणें पदार्थ खाऊन राहण्याची संवय केली पाहिजे. कोणावरही एकदम विश्वास टाकूं नये. कारण, थोड्या निष्काळजीपणाचा फायदा घेऊन सर्वस्वी नागविण्यास टपून बसलेलें अनेक फसवे लोक ह्या देशांत आहेत. अनोळखी इसमानें नेहमीं आपलें कान, व डोळे उघडे टेवून व्यवहार केला पाहिजे. अमेरिकेंतील प्रत्येक गल्लीच्या कोंपऱ्यावर त्या गल्लीचें नांव लिहिलेलें असतें. घरांवर नंबरहि सुंदर व ठळक अक्षरांत लिहिलेले असतात. जेव्हां कांहीं विचारावयाचें असेल, तेव्हां नेहमींच पोलीस शिपायास विचारावें. आपल्याजवळ किती द्रव्य आहे, हें कोणासहि कळूं देऊं नये. दुकानदारांसमोर आपली पैशाची पिशवी केव्हांहि सोडूं नये. कांहीं रुपयांची जरूरी पडल्यास, कोणी पाहणार नाहीं अशा टिकाणीं बसून पैशाची पिशवी सोडावी व खरेदी करण्याकरितां जितक्या पैशांची जरूरी असेल, तितकें पैसे वर काढून ठेवावें.

**प्रश्न** ९—अमेरिकेंतील विश्वविद्यालयांत प्रवेश मिळण्याकरतां किती शिक्षणाची जरूरी असते ?

**उत्तर**— हॉयस्कूलपर्यंत शिकलेल्या विद्यार्थ्यांस अमेरिकन युनिव्हर्सिटींत प्रथम उमेदवार–विद्यार्थी (Special student) म्हणून दाखल करण्यांत येतें. त्याचे ज्या विषयाचें शिक्षण कमी राहिलें असेल, त्या विषयाचें शिक्षण त्याला अगोदर पूर्ण करावें लागतें. युनिव्हर्सिटींत प्रवेश मिळविण्यास इंग्रजी शिवाय दुसऱ्या एखाद्या युरोपियन भाषेंत पुरेसें गुण मिळाले पाहिजेत. त्या शिवाय तो विद्यार्थी युनिव्हर्सिटीचा सर्व साधारण विद्यार्थी (Regular student) होऊं शकत नाहीं. मी जेव्हां शिकागो युनिव्हर्सिटींत शिकत

होतो तेव्हां एक वर्ष पावेतों मी उमेदवार विद्यार्थी होतो. त्यानंतर सर्वसाधारण विद्यार्थी झालों. ह्याप्रमाणें ज्या हिंदी विद्यार्थ्यांस अमेरिकेंतील विश्वविद्यालयांत प्रवेश हवा असेल, त्यांनीं कमींत कमी म्याट्रिक्युलेशनची परीक्षा पास करून तेथें जावें. मॅट्रिक न होतां ते तिकडे गेल्यास, त्यांना मॅट्रिकची परीक्षा तेथें पास करावी लागेल. विद्यार्जनेच्छु इसम अमेरिकेंत विद्याविन्मुख मुळींच राहूं शकत नाहीं. अर्थातच हिंदी विद्यार्थ्यांना सर्वसामान्य शिक्षण अमेरिकेंत मिळविणें कठीण जात नाहीं.

**प्रश्न १०**—बरोबर एखादें सर्टिफिकेट घेऊन जाण्याची आवश्यकता आहे कीं काय?

**उत्तर**—होय, जो विद्यार्थी मॅट्रिक पास झाला असेल त्यानें हेडमास्तरचें वर्तणुकीबद्दल प्रमाणपत्र व आपल्या शाळेचा वार्षिक अहवाल बरोबर घेऊन जावा, म्हणजे युनिव्हर्सिटीच्या अध्यक्षाला हिंदुस्थानांतील शाळेची स्थिति कळून येईल. जो विद्यार्थी इंटर पास झाला असेल किंवा इंटरपर्यंत शिकला असेल त्यानें आपल्या कॉलेजच्या प्रिन्सिपालचें शिफारसपत्र (Certificate) बरोबर घ्यावें. त्यांत असें लिहवून घ्यावें कीं, मी अमुकविषयाचा अमुक तास अभ्यास केला असून, त्यांत इतके प्राविण्य मिळविलें आहे. असें प्रमाणपत्र मिळविल्यानें अमेरिकेंत पदवी मिळविणें सोईचें होतें. जे विद्यार्थी मॅट्रिकची परीक्षा नापास झाले असतील त्यांनीं आपल्या शाळेच्या हेडमास्तरांकडून पास झालेल्या विषयांचा किती किती तास अभ्यास केला आहे, हें लिहवून घ्यावें. कारण अमेरिकेंत अभ्यासाच्या तासांवरून गूण मिळत असतात. उदाहरणार्थ बी. ए. ची पदवी मिळविण्याकरितां १२८ Credits ची जरुरी असते. एका सहामाहींत विद्यार्थी सोळा Credits मिळवूं शकतो. १६ तास प्रत्येक आठवड्यांत अभ्यास केला म्हणजे एका सहामाहीचे १६ Credits धरण्यांत येतात. ह्याप्रमाणें एका वर्षाचे ३२ Credits झाले. ह्या हिशेबानें चार वर्षांत बी. ए. ची पदवी मिळवितां येतें. हुशार विद्यार्थी केवळ तीन वर्षांतही बी. ए. होऊं शकेल. त्याला दर आठवड्यास सोळापेक्षां अधिक तास अभ्यास करितां येईल. परंतु असें करण्याकरितां युनिव्हर्सिटीच्या अध्यक्षाची खास परवानगी मिळविली पाहिजे.

प्रश्न ११ वाः—अमेरिकेच्या किनाऱ्यावर उतरल्यावर डॉक्टरची परीक्षा होत असते काय?

उः—कोणीही हिंदी इसम जेव्हां हिंदुस्थानच्या एखाद्या बंदरावरून अमेरिकेकडे जातो, तेव्हां त्याची प्रथम हिंदुस्थानांत डॉक्टर तपासणी करतो. अमेरिकेस पोहोंचल्यावर जेव्हां तो एखाद्या बंदरावर उतरतो, तेव्हां दुसऱ्यांदां डॉक्टर–तपासणी होते. भेद इतकाच कीं, हिंदुस्थानांतील बंदरावर डॉक्टर बाहेरील स्वच्छतेकडे लक्ष देतो, कपडे मळके असल्यास कपड्यास वाफारा देण्यास फर्मावितो;व जे डेकचे प्रवासी असतात,त्या सर्वांच्या कपड्यांस वाफारा देण्यांत येतो. वरच्या दर्जाच्या उतारूं बरोबर मात्र असें वर्तन करण्यांत येत नाहीं. त्यांची केवळ नाडीच पाहण्यांत येते. अमेरिकन बंदरावर जी डाक्टर–तपासणी होते, ती विशेषतः डोळ्यांची तपासणी होते. ‘मायोपिया’ दृष्टीच्या लोकांना प्रतिबंध करण्यांत येत नाहीं. परंतु खुपऱ्याचा (Trachoma) आजार असल्यास प्रवाश्याला परत जावयास सांगण्यांत येतें. दुसरा कोणताहि असा सांसर्गिक रोग असला तरी असेंच करण्यांत येतें.

प्र. १२—स्वावलंबी होऊन शिक्षण मिळवूं इच्छिणाऱ्या विद्यार्थ्यांनीं अमेरिकेस गेल्यावर काय करावें?

उः—अमेरिकेंत स्वावलंबी बनून शिक्षण मिळवूं इच्छिणाऱ्या विद्यार्थ्यांनीं प्रथम मजुरी करण्यास शिकलें पाहिजे. वर्णाश्रमधर्माच्या खोट्या अभिमानाचा त्याग केला पाहिजे व सर्व प्रकारच्या मजुरीचें काम करण्याची संवय केली पाहिजे. येथून कमींत कमी आठशें रुपये अवश्य घेऊन जावें, म्हणजे भाडें व तेथें दाखविण्यास पुरेसे पैसे जवळ राहतील. अमेरिकेस गेल्यावर तेथील वर्तमानपत्रें नेहमीं वाचीत असावें, कारण वर्तमानपत्रांच्या मागच्या पानावर Help Wanted अशा मथळ्याखालीं जाहिराती असतात. त्यामध्यें आपल्यालायक जें काम असेल, त्यासंबंधीं चवकशी करावी. युनिव्हर्सिटींत दाखल झाल्यावर युनिव्हर्सिटीच्या Employment bureau मध्यें जाऊन कामाची मागणी करावी. ह्याप्रमाणें प्रयत्न करूनहि काम न मिळाल्यास घरोघरीं हिंडून कामाची चवकशी करावी. ह्याप्रमाणें सतत प्रयत्न केल्यास त्यास काम अवश्य मिळेल.

प्रश्न १३—असा कोणता धंदा आहे कीं, जो शिकल्यानें अमेरिकेंत गेल्यावर सहज काम मिळूं शकेल; व त्याला स्वावलंबनपूर्वक विद्यार्जन करतां येईल ?

उ०—असे बरेच धंदे आहेत.खालील पैकीं एखाद्या धंद्याचें शिक्षण हिंदुस्थानांत मिळवून नंतर अमेरिकेस गेल्यास काम मिळविण्यास फारसें कठीण जात नाहीं. हिशोब ठेवणें ( Book-keeping) टाईपरायटींग, शॉर्टहॅंड, मोटार, ड्रायव्हिंग, सायकल-रिपेअरिंग, ड्राईंग, सेव्हेंइंग, लांकडे करवतीनें कापणें, शिंप्याचें काम, विणकराचा धंदा, गाईदोहणें, घोड्याची शागीर्द करणें, घड्याळी दुरुस्त करणें, जोडें शिवणें, हात पाहून भविष्य वर्तविण्याची विद्या, तोंडातून गोळे काढणें, शरीरांतून कांटे आरपार काढून दाखावणें, जादुगाराचे खेळ करून दाखाविणें, जन्म पत्रिका तयार करणें, विस्तवावरून चालणें, कुस्ती किंवा इतर हिंदुस्थानीं खेळाची माहिती मिळाविणें, ह्यांपैकीं, एखादी कला किंवा धंदा आल्यास काम मिळाविणें फारसें जड जात नाहीं. थोडेंसे सुतारींचें काम आल्यासहि बरीच प्राप्ती होऊं शकते. पाथरवटाचें काम येत असल्यास फारच चांगलें; कारण हा धंदा करणाऱ्या इसमांस रोजची मजुरी १५–२० रुपयांपेक्षां कमी मिळत नाहीं. सारांश, हिंदुस्थानांतच कोणताना कोणता धंदा शिकून नंतर अमेरिकेस गेल्यास तेथें द्रव्यार्जन करण्यास सोईचें होतें.

ज्या विद्यार्थ्यांजवळ मुळींच पैसे नसतात व जे जहाजावर काम करून अमेरिकेस जाऊं इच्छितात त्यांच्या मार्गांत अनेक अडचणी आहेत. वर्ण गोरा असून मांस भक्षण करण्याची तयारी असल्यास, त्यांस जहाजावरील काम करतां येईल. मुंबईसारख्या मोठ्या बंदरावर पुष्कळ जहाजें येत असतात, व त्यावर खलाशांची नेहमींच जरुरी असते. जहाजावर खलाशीं म्हणून भरती होणें मोठेंसें कठीण नाहीं, परंतु खलाशाचें काम करणें हिंदी विद्यार्थ्यांस फार जड जातें.

प्र० १४—संस्कृत जाणणाऱ्या विद्यार्थ्यांस स्वावलंबी बनून, आपला चरितार्थ व अध्ययन चालावितां येणार नाहीं काय ?

उ०:—हे होऊं शकेल व नाहींहि होऊं शकणार. विद्यार्थी बोस्टन, न्यूयार्क, शिकागोसारख्या शहरीं शिकत असल्यास त्याला संस्कृत-प्रेमी गृहस्थ किंवा स्त्री मिळूं शकेल. परंतु अशा भरंवशावर अमेरिकेस जाण्याचें धाडस करणें मूर्खपणाचें

होईल. कदाचित् असा गृहस्थ मिळेल कदाचित् मिळणार नाहीं. जो विद्यार्थी चांगला वक्ता असेल ज्यानें आपला देशाच्या सामाजिक, धार्मिक किंवा वाङ्मय विषयक स्थितीचें अवलोकन केलें असेल, त्याला निरनिराळ्या क्लबांतर्फे व्याख्यानें करवितां येईल. ही गोष्ट पूर्वभागांतील शहरांत शक्य आहे, पश्चिम भागांत नाहीं. वक्तृत्वाच्या जोडीला ज्याच्याजवळ निरनिराळ्या प्रांताच्या 'Slides' असतील, व ज्यानें हिंदुस्थानांत सर्वत्र संचार केला असेल तो आपला चरितार्थ मौजेनें चालवूं शकेल. कारण चर्चमध्यें व क्लबांत व्याख्यानें ऐकणारें बरेच लोक असतात; व ते चांगला मोबदलाहि देतात. ह्याकरितां ज्यांना अशा प्रकारचें काम करावयाचें आहे, त्यांनीं फोटोग्राफी व Slides तयार करण्याची विद्या अवश्य शिकावी, व अमेरिकेस जातांना आपल्याबरोबर आपल्यादेशाच्या निरनिराळ्या भागांतील सहा सातशें Slides न्याव्या. मॅजिक लॅंटर्न तेथें विकत किंवा भाड्यानें घेतां येईल.

**प्रश्न १५**—कोणकोणत्या वस्तु आम्हीं येथून बरोबर घेऊन जाणें जरूरीचें आहे?

**उत्तर**—पुष्कळ सामान बरोबर घेणें चांगलें नाहीं. येथून एक चांगला मोलवान ओव्हरकोट करवून घ्यावा. इंग्रजी नमुन्याचा एक पूर्ण सूट, वस्तरा, फणी वगैरे हजामतीचें सामान, एक कांबळे, एक डायरी, चारपांच शर्ट्स, पांच सहा कॉलर्स व नेकटॉय, एक इंग्रजी टोपी इत्यादि सामान बरोबर घ्यावें. मोटी टोपी अमेरिकेस गेल्यावर घेतां येईल. सामान जितकें थोडें असेल तितकें सोईस्कर असतें. वरील सर्व वस्तु एका लहानशा बॅगमध्यें ठेवाव्या व बाकीच्या जरूरीच्या वस्तु अमेरिकेस गेल्यावर खरेदी कराव्या.

**प्रश्न १६**—स्वतः हातानें स्वयंपाक करणाऱ्या विद्यार्थ्यांस आपली व्यवस्था कशी लावतां येईल?

**उत्तर**—माझ्या बरोबर जे डेकवरचे उतारूं होते, ते सर्व आपलें अन्न आपल्या हातानींच शिजवीत असत. हांगकांगपासून व्हॅंकोव्हरपर्यंत जाण्यास साधारणतः एक महिना लागतो. सर्व प्रवासांत आपलें अन्न आम्हींच शिजविलें पुष्कळ उतारूं हातानें स्वयंपाक करूं इच्छिणारे असल्यास अशी व्यवस्था होऊं शकेल. परंतु केवळ एक दोघांकरितां अशी व्यवस्था होणें कठीण आहे. अमेरिकेस गेल्यावर मात्र आपल्याकरितां स्वतंत्र खोली पाहून, आपल्याला हवें तसें

करतां येईल; तेथें कांहीं त्रास पडणार नाहीं. मी हातानेंच स्वयंपाक करीत असें. वाशिंग्टन युनिव्हर्सिटींत शिकत असणाऱ्या बहुतेक विद्यार्थ्यांनीं अशीच व्यवस्था केली होती. कारण, असें केलें असतां थोड्या खर्चांत विद्यार्जन करतां येतें.

प्रश्न १७—हिंदी विद्यार्थ्यांना मदत करण्याकरतां अमेरिकेंत एखादी संस्था स्थापन करण्यांत आली आहे काय ?

उ०—अलीकडे अशी एक संस्था स्थापण्यांत आलेली आहे. ह्या संस्थेला 'हिंदुस्थान असोशिएशन ऑफ अमेरिका,' हें नांव आहे. ह्या संस्थेचा उद्देश हिंदी विद्यार्थ्यांना मदत करणें हा आहे. संस्थेची मुख्य कचेरी 500 Riverside Drive, New york N. Y., U. S. A. येथें आहे. होतां होईतों स्वतःची अडचण स्वतःच भागविण्यास शिकलें पाहिजे. कोणी कोणास सर्वतोपरी मदत करूं शकत नाहीं. एखाद्यानें एखाद्या विद्यार्थ्यास मदत केली, किंवा एखाद्या महान देशभक्तानें दुसऱ्या एखाद्या विद्यार्थ्यास मदत केली तर हीं केवळ अपवादात्मक उदाहरणें आहेत. अमेरिकेस जाण्यास उद्यत झालेल्या इसमानें, हें समजून असावें कीं, आपल्यावर येणाऱ्या संकटांना आपणांसच तोंड द्यावें लागेल. दुसरा कोणी त्याला मदत करणार नाहीं.

प्रश्न १८—जे विद्यार्थी मुळींच मांस खात नाहींत ते देखील आपली व्यवस्था लावून घेऊं शकतील काय ?

उत्तर—ह्याकरितां सर्व प्रकारचे हाल सहन करण्याची संवय ठेवली पाहिजे. मला ह्या नियमाचें पालन करण्याकरितां बरेंच कष्ट सोसावें लागले. येथून जातांना जहाजावर हातानें स्वयंपाक करण्याची व्यवस्था झाली तर बरेंच झालें. असें न झाल्यास, जहाजावरील बल्लवाचार्याशीं सूत जमविलें पाहिजे, त्याला कांहीं पैसे चारले, म्हणजे काम भागूं शकेल. मग तो आपल्यास मांस न टाकलेलें पदार्थ खाण्यास देण्याची व्यवस्था करूं शकतो. अमेरिकेस पोहोंचल्या वर फळफळावळ, दूध, लोणी वगैरे पुष्कळ प्रकारचे पदार्थ मिळूं शकतात. हॉटेलमध्यें गेलें असतां मोठ्या सावधगिरीनें खाण्याचे पदार्थ मागवावें लागतात; कारण, तेथें खाण्याच्या बहुतेक पदार्थांत मांस, अंडीं, चरबी इत्यादि वस्तूंचा उपयोग केलेला असतो. खाणाऱ्यानें तेथील नोकरांकडून सर्व माहिती अगोदर विचारून घ्यावी, नाहींतर अजाणपणें मांस तुमच्या पोटांत जाईल, व एकदां आंत

गेल्यावर फिरून बाहेर येणार नाहीं ! मोठमोठ्या शहरांत निरामिष उपहार-गृहेंही असतात. परंतु नव्या इसमास अशा गृहांचा शोध लावणें फार कठीण जातें. तेथें कोणा एखाद्यास विचारलें तरी पत्ता लागत नाहीं.कारण, बहुतेक सर्व मांस खातात, अर्थात् त्यांना निरामिष हॉटेलांची माहिती नसते. एखाद्या ' ड्रॅगस्टोअर ' मध्यें जाऊन शहराची Directory पहावी. त्यांत Vegetarian cafe ह्या सदराखालीं आपणाला अवश्य ती माहिती मिळण्याचा संभव आहे.

**प्रश्न १९**—मिडलस्कूल पास झालेला विद्यार्थी अमेरिकेंत गेल्यास त्याचा फायदा होईल काय ?

**उ०**—कां बरें होणार नाहीं ? कांहींहि न शिकतां अमेरिकेस गेलेल्या माणसासहि बराच फायदा मिळवितां येईल. तेथें तर खऱ्या हिंमतीची जरूरी आहे. शिकण्याकरितां सर्व दरवाजे खुले आहेत. मिडल स्कूल पास विद्यार्थी अमेरिकेंत हायस्कुलांत भरतो होऊन मॅट्रिकची परीक्षा पास झाल्यावर विश्व-विद्यालयांत भरती होऊं शकतो.

**प्रश्न २०**—अमेरिकेच्या किनाऱ्यावर उतरतांना कोणाची परवानगी घ्यावी लागतें काय ?

**उ०**—मी पूर्वीच सांगितलें आहे कीं, अमेरिकन बंदरावर उतरल्यावर अमेरिकन सरकारचे अधिकारी येऊन अनेक प्रश्न विचारतात. हीच परवानगी समजा. कांहीं आजार नसेल व दाखविण्यास पुरेसें पैसे असतील तर त्यांच्या-कडून उतरण्याची परवानगी मिळण्यास कांहींच अडचण पडत नाहीं.

**प्रश्न २१**—अमेरिकेच्या कोणत्या भागांत काम मिळविणें सोपें जातें ?

**उ०**—अमेरिकेच्या पश्चिम भागांत अल्पसायासानें काम मिळूं शकतें. कॉलिफोर्निया, ऑरेगान, वाशिंग्टन, ओहियो, मोन्टाना इत्यादि संस्थानांमध्यें काम बरेंच असतें. उन्हाळ्यांत तर ह्या संस्थानांत माणसांना पकडून, काम करण्यास घेऊन जातात व त्यांची खुशामत करतात. ह्या दिवसांत साडेसात रुपयेपर्यंत देखील रोजची मजुरी मिळते.

**प्र० २२**—अमेरिकेंतील राहणें–सवरणें व घरभाडें ह्यासंबंधीची अवश्य ती माहिती सांगण्याची कृपा करावी.

उ०—अमेरिकन लोक इंग्रजी तऱ्हेचा पोशाख करतात; परंतु त्यांच्या फॅशनमध्यें थोडा फरक आहे. ह्याकरितां हिंदुस्थानांतून अमेरिकेस जाणाऱ्या इसमांनीं येथून फारसे कपडे तयार करवून घेऊं नयेत. तेथें गेल्यावर तयार केलेले कपडे विकत घेतां येतात. अमेरिकेंत राहण्याकरितां खोल्या भाड्यानें मिळतात. कांहीं खोल्यांचें दरमहा भाडें २४ रुपये असतें; तर कांहींचें ३० रुपये असतें. ज्या प्रकारची खोली असेल त्याप्रमाणें भाडें कमीजास्त पडतें. जे विद्यार्थी युनिव्हर्सिटीच्या वसति-गृहांत राहूं इच्छितात, त्यांना अधिक भाडें द्यावें लागतें. एखाद्या विश्वविद्यालयाचे वसति-गृहांत भाडें कमी पडतें. निरनिराळ्या विश्वविद्यालयांत खोल्यांच्या भाड्यांचा दर व तद्वतच त्यांतील सोई कमीज्यास्त असतात. ह्या खोल्यांत स्वयंपाक करावयाची व्यवस्था नसते, अर्थात् विद्यार्थ्यांना विश्वविद्यालयाच्या भोजन-क्लबांत जेवण्याकरितां जावें लागतें; किंवा शेजारीं असणाऱ्या दुसऱ्या एखाद्या हॉटेलांत विद्यार्थी आपआपलीं जेवण्याची व्यवस्था करून घेतात.

कपडे धुण्याला प्रत्येक कपड्यामागें पांच आणे, कॉलरचे प्रत्येकीं पांच पैसे, आंतल्या गंजीफ्राकचे प्रत्येकीं चार आणे, असे पडतात. हजामत स्वतःच करण्यास शिकलें पाहिजे. न्हावी हजामतीचें ( दाढी करण्याचे ) आठ आणे किंवा १५ सेंट घेतो. केंस कापण्याचें तेरा आणे द्यावें लागतात. इतर खर्चहि हिंदुस्थानांतील त्याच प्रकारच्या खर्चापेक्षां किती तरी पटीनें अधिक असतात. महिन्यास कमींत कमी ६५ रुपये खर्च येतोच. इतक्या रकमेंत काटकसरीनें राहिल्यास सुशील विद्यार्थी अमेरिकेंत आपला चरितार्थ चालवूं शकतो.

खोली पहावयाची असल्यास दैनिक वर्तमानपत्रें वाचण्याचा सराव टेविला पाहिजे.त्यामध्यें भाड्यानें द्यावयाच्या खोल्यांच्या जाहिराती असतात.गल्ल्यांतून हिंडून फिरूनहि खोल्यांचा तपास करतां येतो. चालतांना दोन्हीं बाजूकडे पाहात गेलें पाहिजे. जी खोली भाड्यानें द्यावयाची असते, तिच्या दारावर Rooms for rent–Furnished–unfurnished–House to let, इत्यादि शब्द लिहिलेल्या पाट्या लटकविलेल्या असतात. जी खोली भाड्यानें द्यावयाची असेल त्या खोलीच्या दारावरील बटन दाबावी म्हणजे घरची मालकीण येऊन दार उघडते; तिला माहिती विचारून घ्यावी. तिच्याशीं सभ्यतेनें भाषण करून खोलीच्या भाड्याचा दर निश्चित करावा. ज्या खो-

लींत आपण राहतो, ती खोली स्वच्छ व साफसूफ ठेवण्याकडे आपले लक्ष असलें पाहिजे. मध्येंच इकडे तिकडे थुंकू नये. अमेरिकेंत सकाळीं उटल्यावर स्नान करण्याची पद्धति नाहीं. सर्व घर आपल्या ताब्यांत असेल तर गोष्ट वेगळी. अशा स्थितींत हवें तेव्हां स्नान करण्यास पूर्ण मुभा असते. असें नसल्यास, दोनप्रहरीं किंवा रात्रीं निजण्यापूर्वी आंघोळ करावी. प्रातःकाळीं शौचास वगैरे जावयाचें असल्यास हळूहळु व पाय न वाजवितां जावें, म्हणजे कोणाच्या झोपेंत तुमच्या वर्तनामुळें व्यत्यय येणार नाहीं. स्वतःच्या सोईप्रमाणें दुसऱ्यांच्या सुखसोईकडेहि आपण लक्ष पुरविलें पाहिजे. मी खोलीचें भाडें देतों तेव्हां हवें तसें वागण्यास मला कोणती हरकत ? असें समजूं नये. गैरशिस्त रीतीनें वागणाऱ्या इसमास त्याचक्षणीं घरांतून घालवून देण्यांत येतें.

स्त्रीयांशीं बोलतांना एकहि असभ्य शब्द न उच्चारण्याची खबरदारी घ्यावी. स्त्रियांशीं केव्हांहि तंटाबखेडा करूं नये. अमेरिकेंतील स्त्रीपुरुप त्या देशांतील रिवाजाप्रमाणें नम्रपणें व हंसत हंसत भाषण करतात. त्यांच्या अशा वागण्याचा कोणी भलतांच अर्थ करूं नये ! बोलतांना एकादा शब्द न कळल्यास I beg your pardon असें म्हणून फिरून विचारावें. एकाद्यानें आपली खालीं पडलेली वस्तु उचलून दिली तर लागलींच Thank you very much असें म्हणून उपकाराची फेड करावी. असें न म्हटल्यास तिकडील लोक आपल्याला असभ्य समजतात, व आपल्याशीं फिरून कधीं भाषण करीत नाहींत. ह्या गोष्टी दिसावयास क्षुल्लक असल्या, तरी अशाच गोष्टींवरून त्या देशांत मनुष्याची सभ्यता ठरविण्यांत येते.

कोणाची भेट घेण्यास जावयाचें असतां किंवा शाळा कालेजांत जातांना नेहमीं कॉलर, नेकटॉय, कोट, पँट घालून व केंस नीटनेटके करून जावें. बूट साफ असावा. व हजामत केल्याशिवाय कोणास भेटावयास जाऊं नये. पोषाख वगैरे बाबतींत कोणतीहि कमतरता टेऊं नये. कपडे वगैरे नेहमीं स्वच्छ व नीट शिवलेले असावेत. ह्या बाबींकडे तिकडे फार लक्ष पुरविण्यांत येतें. आपल्या देशांतील सभ्यतेचे नियम निराळ्या प्रकारचे असतात. ह्याकारितां अमेरिकेतील पाश्चात्य सभ्यतेचे नियम हिंदी विद्यार्थ्यांस माहित असणें अत्यंत आवश्यक असतें.

आतां शौचविधिसंबंधीं माहिती सांगतों. अमेरिकेंतच काय, पण सर्व पाश्चात्य राष्ट्रांत गुदमार्ग स्वच्छ करण्याकरतां आपल्या देशांतील रिवाजाप्रमाणें

पाण्याचा उपयोग न करतां, कागदाचा उगयोग करतात.पाण्याचा तांब्या बरोबर शौचकूपांत नेण्याची तिकडे पद्धत नाहीं. शौचकूपाच्या खोलींत एक स्टूल असतो. पँट खालीं सरकवून मनुष्य त्या स्टूलावर खुर्चीवर बसल्याप्रमाणें बसतो. मलोत्सर्ग–क्रिया संपली म्हणजे, कागदाच्या केसमधून एक कागद फाडून तो गुदद्वार स्वच्छ पुसतो. इतकें झाल्यावर साखळी ओढली कीं, जमिनीच्या खालीं मळ वाहून नेण्याकरितां मोटमोठ्या नाल्या असतात, त्या नाल्यांमध्यें सर्व मळ जाऊन पडतो. नाल्यांतून मळ एखाद्या नदींत किंवा समुद्रांत किंवा गांवापासून लांब जागीं वाहून नेण्यांत येतो. हे कागद निराळ्याच प्रकारानें केलेलें असतात. ह्यास ‘Toilet paper’ हें नांव आहे. हा कागद फार हलका असतो. घराची मालकीण सावण शाचै–पत्रें वगैरे सामान देतें. स्टूलवर दोन्हीं पाय ठेवून केव्हांहि बसूं नये. खालीं पाय सोडून आपण स्टूलवर बसतो त्याप्रमाणें त्यावर बसावें. केवळ लघवी करावयाची असेल तेव्हां स्टूलवरची लाकडी चौकट वर उचलावी व मूत्रोत्सर्जन करावें. ‘शौचकूप कोठें आहे, असें विचारावयावचें असतां, Water closetकिंवा Lavatary कोठें आहे ? असें विचारावें.

राहण्यासवरण्यासंबंधीं ह्या थोडया सूचना केल्या आहेत. ह्यांपासून माझे हिंदी बांधव योग्य तो बोध घेतील, अशी मला उमेद आहे.

प्र० २३—अमेरिकन लोक हिंदी विद्यार्थ्यांबरोबर कशा रीतीनें वागतात ?

उ०—शाळा कॉलेजें किंवा विश्वविद्यालयांमध्यें अमेरिकन विद्यार्थी व अध्यापक हिंदी विद्यार्थ्यांबरोबर चांगल्याप्रकारचें वर्तन ठेवतात. कोणताहि प्रकारचा पक्षपात वगैरे करीत नाहींत.इतर अमेरिकन लोकंहि हिंदी विद्यार्थ्यांशीं चांगल्या तऱ्हेनें वागतात. परंतु युरोपियन कुली व निरनिराळ्या देशांतून अमेरिकेंत येणारे गोरे लोक हिंदी लोकांचा द्वेष करतात. ह्याचें कारण स्पष्टच आहे. हे लोक फार सकुंचित बुद्धीचे असतात. त्यांच्या देशांत त्यांना कांहीं अनुभव आलेला नसतो. अमेरिकेंत गेल्यावर हे लोक साहेबी ऐट आणून मोठ्या दिमाखानें समाजांत वावरतात. कुली लोकांत तर आपल्या हिंदी लोकांविषयीं पक्षपातबुद्धि नेहमींच जागरूक असतें. ह्यामुळें मला फार हाल सहन करावे लागले. कारण मला आपला चरितार्थ चालविण्याकरितां द्रव्यार्जन कराव लागे, तेव्हां मला मजूर लोकांबरोबर काम करण्याचा प्रसंग येई. मजू-

रांच्या त्रासांतून सुटका करून घेण्याकरितां आपल्या हिंदी विद्यार्थी बंधूंकरितां व इतर सद्गृहस्थांकरितां एक युक्ति सुचवून ठेवतों.

१९०९ च्या उन्हाळ्यांत मी सियेटल शहरांत काम करीत होतों. तेथें बरेचसे गोरे मजूरहि काम करीत होते. एका श्रीमंत मनुष्यानें आपल्यासाठीं एक इमारत बांधण्यास सुरूवात केली होती. ट्रॅफ (Trough) मध्यें विटा भरून मीं दुसऱ्या मजूरांस देत होतों. माझ्या शेजारीं काम करीत असलेला गोरा मजूर फार धूर्त व चलाख होता. जेव्हां जेव्हां त्याला संधि मिळे, तेव्हां तेव्हा तो मला '(Damn hindu)' 'हलकट हिंदी मजूरा' अशा शेलक्या शब्दांनीं हिणवीत असे. प्रथम प्रथम हिंदी स्वभावाला अनुसरून त्याच्या असल्या शिव्या मीं मुकाट्यानें ऐकून घेत असें व तंटा करण्याचें होतां होईतों टाळीत असें. एक दिवस त्यानें मला मायबहिणीची शिवी दिली. माझ्या सहनशीलतेचा ह्या दिवशीं परोत्कर्ष झाला. लगेंच मी त्याला जमीनीवर धाडकन् पाडलें व त्याच्या छातीवर गुडघे टेकून त्याला यथेच्छ चोप दिला व नंतर त्याला सोडून दिलें. सोडतांना त्याला बजाविलें, "बच्चाजी, आजवर शिव्या दिल्या त्या दिल्या, आतां तूं शिवी दे म्हणजे तुला आजच्या पेक्षांहि अधिक जबर दक्षिणा मिळेल."

मला त्रास देण्याचा तोच त्याचा शेवटचा दिवस होता. त्यानंतर त्यानें मला फिरून कधींहि त्रास दिला नाहीं. उलट त्या दिवसापासून तो मला "भाई" ह्या प्रेमळ शब्दानें संबोधूं लागला. ह्या करितां पाश्चात्य सभ्यतच्या पुढील नियमानुसार हिंदी बांधवांनीं नेहमीं निर्भय असावे. कोणाचीहि भीति बाळगूं नये.

"The good old plan,
That he shauld take who has the power,
And he should keep who can."

अर्थात् "सर्वांत चांगला व पुरातन मार्ग म्हटला म्हणजे, बलवान असेल त्यानेंच हातांत सत्ता बाळगावी, व जो बलवान असेल त्यानेंच ह्या जगांत राहावें".

एखाद्या गोऱ्या माणसानें आपली खोडी केली किंवा आपल्याला शिवी दिली कीं, लागलींच त्याला चांगला चोप द्यावा. असें केलें तरच आपल्याला तेथें प्रतिष्ठापूर्वक राहतां येईल व आपला बोज राहील.

प्रश्न २४—कोणत्या प्रकारचें काम तेथें मिळतें ?

उ०—अमेरिकेंत विद्यार्थ्यांना अनेक प्रकारचीं कामें करावीं लागतात. उन्हाळ्यांत शेतावर जाऊन काम करावें लागतें, किंवा बागेंमध्यें फळें वेंचण्याकरितां जावें लागतें किंवा Hops वेंचण्याकरितां इकडे तिकडे जावें लागतें. विश्वविद्यालयाचें काम सुरूं असतां भांडीं घासणें, घरसाफ करणें, भट्टींत कोळसे टाकणें, गवत कापणें इत्यादि प्रकारचीं कामें त्यांस करावीं लागतात. ज्यांना मजुरीचा धंदाच करावयाचा असतो, त्यांना कायम मजुरीचा शोध करावा लागतो. लांकडे फोडण्याच्या गिरण्या, सडकांवर किंवा शेतकऱ्यांच्या मोठमोठ्या शेतांवर त्यांस काम करावें लागतें. सर्व वर्षभर त्यांना तेंच काम पुरूं शकतें. त्यांना सहा ते आठ रुपयांपर्यंत रोजची मजुरी मिळते. एखाद्या वर्षी मजुरीचा दर कमी असतो. ज्या दिवसांत अध्यक्षाच्या निवडणुकीची धामधूम सुरूं असतें, त्या दिवसांत शेतकऱ्यांचें काम कमी असतें, अर्थात् मजुरांची मागणी कमी असते व मजुरीचा दरहि कमी होतो.

अशाच प्रकारचें काम अमेरिकेंत आमच्या हिंदी बांधवांना करावें लागतें. फार थोडें इसम दुकानदारीचा किंवा फेरीवाल्याचा धंदा करतात. आपल्या देशांतील जाणत्या लोकांनीं तेथें जाऊन व्यापार करून, संपत्ति मिळविली पाहिजे; व आपल्या देशाचें वैभव वाढविलें पाहिजे. परंतु आपल्या लोकांना सोंवळ्या ओंवळ्याच्या विचित्र कल्पनांनीं अद्याप सोडलेलें नाहीं. बिचारे मजूर मात्र तेथें जाऊन आपल्या शक्तिनुसार द्रव्यार्जन करीत आहेत व अशा रीतीनें आपल्या देशाचें नांव त्या देशांत गाजवीत आहेत.

प्रश्न २५—स्थापत्य ( एंजिनियरींग ) वगैरे संबंधीं शिक्षण देणारें चांगलें विश्वविद्यालय कोणतें ? व डेंटिस्ट्रीचें काम शिकण्याकरितां कोठें गेलें पाहिजे ? हें कृपा करून सांगावें

उ०—पेनासिल्व्हॅनिया संस्थानांतील पिट्सबर्ग शहरीं कॉर्नेजी साहेबांचें एक मोठें विश्वविद्यालय आहे. तेथें हरप्रकारचें स्थापत्याचें काम शिकविण्यांत येतें. तेथें जाऊन भारतीय विद्यार्थी चांगल्या रीतीनें स्थापण्याचें शिक्षण घेऊं शकतात. तेथें शिक्षणाला खर्चहि कमी येतो. सर्व सामान्यतः प्रत्येक संस्थानच्या विश्वविद्यालयांत स्थापत्याचें शिक्षण देण्याची व्यवस्था

असते. परंतु 'कॉर्नेजी विश्वविद्यालय' खास स्थापत्याचें शिक्षण देण्याकरितां स्थापन करण्यांत आलें आहे. तेथील अधिक माहिती हवी असल्यास, The Registrar, Carnegie Technical Institute, Pittesburg. Pa. U. S. A. ह्या पत्त्यावर पत्र पाठवून माहितीपत्रक मागवून घ्यावें.

ज्यांना दांत बसवण्याची कला शिकावयाची आहे, त्यांनीं न्यूयार्क, बास्टन, शिकागो ह्या सारख्या मोठ्या शहरीं जावें. ह्या शहरांतून ही कला शिकविण्याच्या शाळा उघडण्यांत आल्या आहेत.

प्रश्न २६—अमेरिकेंत Night Schools संबंधीं कशी काय व्यवस्था आहे ?

उ०—जेथें रात्रीच्या शाळा नाहींत असे अमेरिकेंत एकहि मोठें शहर नसेल. ज्यांना दुपारीं शाळेंत जाण्यास सवड नसते, त्यांच्या शिक्षणाची व्यवस्था ह्या शाळांतून केलेली असते. कार्नेजी विश्वविद्यालयांतहि रात्रीच्या शाळा आहेत. ह्याचप्रमाणें जेथें जेथें मजुरांची भरती फार आहे व त्यांना शिक्षणाची गोडी आहे, तेथें तेथें रात्रीच्या शाळा उघडण्यांत आल्या आहेत. ह्या शाळांत फी अधिक नसते व शिक्षण सुविद्य अध्यापकांकडून देण्यांत येतें. अमेरिकेंत शिक्षण मिळविण्याकरितां बऱ्याच सोई आहेत, हे हिंदी विद्यार्थ्यांनीं लक्षांत ठेवावें. ज्याला विद्येची मुळींच गोडी नाहीं त्यालाच केवळ अमेरिकेंत विद्या संपादन करतां येणार नाहीं.

प्रश्न २७-अमेरिकेंतील ऋतूसंबंधी कांहीं माहिती सांगण्याची कृपा करावी.

उ०—अमेरिकेंत थंडी फार असते. उत्तर व पूर्व भागांतील संस्थानांत तर फार बर्फ पडतें. मध्यभागांतील संस्थानांतहि बर्फ पडतें. आक्टोबर महिन्यांत थंडी पडायला सुरुवात होते व मे महिन्यांत कोठें थोडी थंडी कमी होतें. पश्चिम व दक्षिण भागांतील संस्थानांत मात्र बर्फ केवळ नांवाला पडतें. ह्या देशांत बाहेर निजण्याची मुळींच सोय नाहीं. सर्व ऋतूंत लोक घरांतच निजतात. अमेरिकेच्या बऱ्याच भागांतील हवा हिंदी लोकांस मानवणार नाहीं, कारण, आपणांस इतकी थंडी सोसण्याची संवय नसते. आमच्या कित्येक बांधवांचे तेथें हिवाळ्यांत फार हाल होतात. मेमध्यें थंडी थोडी कमी होते, व जूनमध्यें वसंत ऋतूला आरंभ होतो. सप्टेंबरपर्यंत चांगलाच उकाडा असतो. ह्या महि- न्यांतील हवा कोरडी असते. ह्या दिवसांत पाऊस पडत नाहीं. एखादे दिवशीं

पावसाची सर आली तर आली, ह्याकरितां आमच्या बंधूंनीं जास्त थंडी सहन करण्याची तयारी ठेवली पाहिजे.

**प्रश्न २८**–एखादा विषय स्वतंत्रपणें शिकावयाचा असल्यास काय करावें ?

उ०—अमेरिकेंतहि हिंदुस्थानांतल्याप्रमाणें शिकवण्यांची (ट्युशनची) पद्धति आहे. निरनिराळे विषय शिकविण्याकरितां चांगलें तज्ज्ञ अध्यापक मिळूं शकतात.रोजची फी कमींत कमी दरतासीं १॥रुपया याप्रमाणें अध्यापकांस द्यावी लागते. कॉलेजांतहि केवळ एक विषय शिकविण्याची व्यवस्था होऊं शकते. ह्याकरितां कॉलेजच्या अध्यक्षाची परवानगी काढावी लागते. ह्याप्रकारें ज्याला जो विषय शिकावयाचा असेल, तो विषय शिकण्याची व्यवस्था लावून घेतां येतें. परंतु असल्या बाबींचा निर्णय अमेरिकेस गेल्यावर सहज करतां येईल. येथें ह्यासंबंधीं अधिक सांगणें निरुपयोगीच ठरेल.

**प्रश्न २९**—अमेरिकेंतलि विश्वविद्यालयाची पदवी घेतलेला हिंदी युवक हिंदुस्थानांत आल्यावर काय करूं शकेल ?

उ०—ह्या प्रश्नाचें उत्तर मी काय देऊं शकणार ? हें ज्याप्रकारचें शिक्षण घेतलें असेल, त्यावर अवलंबून राहील. जो युवक ज्या विषयांत प्रवीण झाला असेल तो त्या विषयाच्या द्वारेंच आपला व आपल्या देशाचा फायदा करून घेऊं शकेल. हिंदी युवकांनीं अमेरिकेंत कलाकौशल्याचें शिक्षण मिळविण्याचे प्रयत्न केले पाहिजेत. आमच्या देशांत शास्त्रीय पद्धतीनुसार इमारती बांधण्यांत आल्या पाहिजेत. अमेरिकेंत जाऊन कांहीं विद्यार्थ्यांनीं Architecture चें शिक्षण मिळविल्यास आपल्या देशाचा फार फायदा होईल. एखाद्या यंत्राचे निरनिराळे विभाग बनविणें व त्यांचा उपयोग जाणणें किती जरूरीचें आहे बरें ? आपल्याला लहान लहान किरकोळ वस्तूंकरतांहि दुसऱ्या देशांवर अवलंबून रहावें लागतें. आम्हांस शिक्षणशास्त्राचीहि चांगली माहिती नाहीं. कोलंबिया विश्वविद्यालयांत शास्त्रीय विषय शिकविण्याच्या पद्धतीचें शिक्षण घेऊन, त्याचा आपल्या देशांत प्रसार करावयाला पाहिजे. छत्री, कागद, पेंसिल, साखर घोडे, प्याले, पेंचाखिळे, लहान लहान यंत्रें बनविणें व त्यांचें उपयोग जाणणें इत्यादि शेंकडों गोष्टी अमेरिकेस जाऊन शिकतां येतात. कृषिविषयक शास्त्रीय शिक्षणाचीहि आपल्या देशांत कितीतरी जरूरी आहे. अमेरिकेंतील कृषिमहाविद्यालयांत भरती होऊन आम्हीं कृषीचें उत्कृष्ठ शिक्षण मिळविलें पाहिजे; व

आपल्या देशांतील शेतीमध्यें योग्य त्या सुधारणा घडवून आणल्या पाहिजेत. ह्याशिवाय फळांच्या व्यवसायासंबंधीचे(Fruit Industry)शिक्षण संपादन केल्यास आपल्या देशाचा कोट्यावधि रुपयांचा फायदा करून देतां येईल. कारण फळांचा धंदा अमेरिकेंत बऱ्याच पक्क दशेप्रत पोहोंचला असून, हा धंदा हिंदुस्थानांत फार मोठ्या प्रमाणांत करतां येण्यासारखा आहे. अमेरिकन लोक ह्या धंद्याच्या बळावर हजारों कोटी रुपये मिळवितात. आपले लोकहि कलाकौशल्य, कृषि, फळाचा धंदा इत्यादि विषयांचें शिक्षण मिळवून व आपल्या ज्ञानाचा उपयोग करून, आपल्या देशाचें दारिद्र्य घालवून देऊं शकतील.

यंत्रांचा उपयोग समजून घेण्याकरितां आमच्या विद्यार्थ्यांना अमेरिकन कारखान्यांत जाऊन काम करावयास पाहिजे. त्यांना यंत्रांच्या भागांचा उपयोग कसा करावा, हें माहित करून घ्यायला पाहिजे. केवळ यांत्रिक शिक्षण घेण्याकरतां शेंकडों विद्यार्थी अमेरिकेंत गेलें पाहिजेत.

**प्रश्न ३०**—खर्चण्याकरितां कोणतें नाणें बरोबर घेणें योग्य होईल ? नोटा, पौंड, हुंडी ह्यांमधून कोणत्या स्वरुपांत नाणें घेणें सोईस्कर आहे ?

**उ०**—इंग्रजी पौंड सर्व ठिकाणीं चालतात. कांहीं नाणें बरोबर घ्यावयाचें असेल तर तें पौंडाचेंच घ्यावे. आपल्याबरोबर बरीच रक्कम घ्यावयाची असल्यास एखाद्या बँकेंतर्फे न्यूयार्कच्या एखाद्या बँकेच्या नांवानें हुंडी लिहवून घ्यावी. हिंदुस्थानांतील रुपये आपल्या बरोबर घेऊं नयेंत, कारण, चांदीच्या भावांत नेहमीं चढउतार होत असतो. परंतु सोन्याचा भाव साधारणतः सारखाच राहातो. ह्याकरितां इंग्रजी पौंड बरोबर घेणें चांगलें असतें. शिवाय इंग्रजी पौंड जगाच्या कोणत्याहि भागांत गेले तरी चालूं शकतात.

युरोप मार्गानें प्रवास करणाऱ्यांनीं इटली किंवा फ्रान्सचें नाणें आपलें जवळ फारसें बाळगूं नये. एखाद्या देशाच्या बंदरावर जहाज उभें राहिलें व तेथें नाण्याची आवश्यकता भासली तर होतां होईतों मौल्यवान नाणें मोडूं नये. लहान नाणें मोडून काम भागवावें; कारण, ह्या देशांतील नाणीं पुढें अमेरिकेंत मुळींच चालत नाहींत. हीच स्थिति जपान व चीनच्या नाण्यांची आहे.

**प्रश्न ३१**—अमेरिकेंत वर्ण, जाति वगैरे संबंधीं निर्बंध आहेत काय ?

**उ०**—अमेरिकेंत हिंदुस्थानांतल्याप्रमाणें जाति वगैरे नाहींत. रंगाचा मात्र पक्षपात तेथें फार दिसून येतो. पश्चिम भागांतील संस्थानांत मजूर लोक

एशियाटिक लोकांचा फार द्वेष करतात. हाच अमेरिकेंतील वर्णविषयक निर्बंध समजा.

**प्रश्न ३२**—हिंदुस्थांनातील कोणत्या वस्तु अमेरिकेंत नेल्यापासून फायदा होतो ?

**उ०**—हिंदुस्थानांतील पितळी भांडयांना अमेरिकेंत फार किंमत येतें. लांकडी व हस्तिदंती वस्तूंहि अमेरिकन लोकांस फार आवडतात, परंतु कोणाहि हिंदी बांधवास अशा वस्तू आपल्याबरोबर तेथें घेऊन जाण्याचा सल्ला मी देणार नाहीं. नवख्या माणसानें अशा वस्तू तिकडे नेल्यास त्याचें नुकसान फार होईल. तेथें मजुरीचा दर इतका मोठा असतो कीं, नुकसान होण्याचीच फार भीति असते. हिंदुस्थानांत सर्वत्र फिरून ह्या वस्तूंच्या भावाची चांगली चवकशी करावी; व ह्या वस्तु विकणाऱ्या व्यापाऱ्यांशीं परिचय करून ठेवावा. अमेरिकेंत गेल्यावर व तिकडे लोकांशीं ओळखी झाल्यावर वरील वस्तु मागविण्याची व्यवस्था करावी. ह्या रीतीनें काम केल्यास पुष्कळ फायदा होऊं शकेल. काम करावयाचें असल्यास साधनेंहि उपलब्ध होतात. कांहीं तपास किंवा विचारपूस न करतां एकदम वस्तू घेऊन जाणें व मग त्यांच्या खपाकरितां इकडे तिकडे भटकणें अत्यंत नुकसानीचें असतें.

**प्रश्न ३३**—अमेरिकेस गेल्यानें व्यापारी लोकांस कांहीं फायदा होऊं शकेल काय ?

**उत्तर**—हिंदी व्यापाऱ्यांनीं एकदां तरी अमेरिकेस जावें, अशी त्यांस मी अवश्य विनंती करीन. तेथें व्यापार कसा काय चालतो ह्याचें त्यांनीं सूक्ष्म निरीक्षण करावें. ह्यासंबंधीं विशेष स्पष्टपणें कांहीं सांगतां येणार नाहीं. कारण, ह्या बाबी प्रत्यक्ष पाहावयाच्या असतात. अमेरिकेंत जे व्यापार करतात किंवा ज्यांचा परदेशाशीं व्यापार चालतो ते स्वतः परदेशांत जातात व ह्यासंबंधीची माहिती मिळवितात. अमेरिकेस जाऊन तेथें ज्यांना थोडया भांडवलांवर व्यापारास सुरुवात करावयाची असेल, त्यांनीं जपानी लोकांप्रमाणें कार्यास आरंभ केला पाहिजे. फळाची लहान लहान दुकानें, चिरूट, सदरे, कॉलर इत्यादि वस्तु विकण्याचीं दुकानें काढून किंवा 'बिलियर्ड रूम' उघडून आपल्या कामास सुरुवात करावी. नंतर हळु हळु भांडवल वाढवून अधिक महत्त्वाचीं कामें हातांत घेतां येतील. ह्या सर्व गोष्टी घडून येण्याकरतां तेथें गेलें पाहिजे, व मग तेथील रंग-

रूप पाहून जरूर भासेल त्याप्रमाणें काम करण्यास आरंभ केला पाहिजे. चिनी व जपानी लोक असेंच करीत आले आहेत. त्यांना त्यांच्या उद्योगांत यशहि मिळालें आहे; अर्थात् अशा प्रकारें काम केल्यास आम्हांसहि यश मिळाल्याशिवाय राहणार नाहीं.

**प्रश्न ३४**—अमेरिकेंत आपलें लोक व्यापारांत गुंतले आहेत काय? असल्यास ते कोणता व्यापार करतात?

**उ०**—होय, आहेत. पूर्वभागांत न्यूजॅरेजी नांवाचें संस्थान आहे. त्यामध्यें बरेचसे मुसलमान बंधू फेरीवाल्याचा धंदा करीत असतात. न्यूयार्क बोस्टन वगैरे शहरांतहि कांहीं हिंदी लोक इकडचा तिकडचा माल आणून विकतात व द्रव्यार्जन करतात. दक्षिण भागांतील संस्थानांत बरेच पठाण आहेत; ते येथून शाली वगैरे मागवून तेथें व्यापार करतात; व बरेंच धन मिळवितात. परंतु हिंदु लोकांना तर सोंवळ्या ओंवळ्यांच्या कल्पनांनीं भारून टाकलेलें आहे. ज्यांनीं ह्या कल्पनांना झुगारून देऊन अमेरिकेंत प्रवेश केला, तेहि मजुरीपेक्षां अधिक महत्त्वाचा धंदा करीत नाहींत. पंजाबांतील शीख शेतकऱ्यांस व्यापारांतील मर्म काय कळणार? हा धंदा तर मारवाडी, कायस्थ किंवा वैश्य लोकांचा आहे. ह्याकरितां ज्यांना ईश्वरानें थोडीबहुत बुद्धि दिली आहे, अशा व्यापारी पेशाच्या लोकांनीं अमेरिकेंत जाऊन मुसलमानांप्रमाणें द्रव्यार्जन करण्यास सुरुवात करावी. अमेरिकेच्या संयुक्त संस्थानांत असे एकहि शहर नाहीं कीं जेथें थोडे देखील जपानी लोक नाहींत. हे लोक तेथें जाऊन जमिनी विकत घेतात, वसाहती करितात, दुकानें उघडतात व अशा प्रकारें निरनिराळे व्यवसाय करून आपल्या देशाचा फायदा करतात. हिंदी मनुष्यांनीं अद्याप असें केलें नाहीं. ह्याचें कारण हेंच कीं, शिकलेल्या मंडळीचें ह्या गोष्टीकडे अजून लक्ष गेलें नाहीं. आमच्या देशबंधूंनीं इकडे लक्ष पुरवून आपल्या देशाचें दारिद्र्य घालविण्याचें उद्योगास लागावें अशी माझी परमेश्वरांस नम्र विनंति आहे.

ह्याबरोबरच मला हेंहि सांगितलें पाहिजे कीं, जे अमेरिकेंत व्यापार करीत आहेत, ते आपणांस भारतीय न म्हणवितां अफगाणिस्तान किंवा परशियाचे रहिवाशी म्हणवून घेतात. कारण, भारतीय म्हणविल्यानें त्यांच्या कामांत बराच व्यत्यय येतो, ह्यांतील मर्म काय हे विचारी माणसांस सहज कळून येईल.

**प्रश्न ३५**—अमेरिकेंत चीनी किंवा जपानी लोक व्यापार करतात काय ? व्यापार करीत असल्यास, त्यांचें वृत्त थोडें विस्तारपूर्वक सांगण्याची ा करावी.

**उ०**—अमेरिकेंत चिनी व जपानी माणसें निरनिराळ्या धंद्यांत गुंतलेलीं हेत. चीनी लोक बहुधा परीटाचा धंदा करितात. अमेरिकेंत असें एखादेंच हर असेल कीं, जेथें चिनी परीट नाहींत. थोडेंसे द्रव्य घेऊन हे अमेरिकेंत जातात स्वतःच्या कर्तबगारीच्या जोरावर श्रीमंत बनतात. त्यांच्या कोठ्या असून ठमोठ्या शहरांतून त्यांची भोजनालयेंहि आहेत. त्या भोजनालयास "चाप " हें नांव आहे. त्यामध्यें सर्व जातीचे लोक जातात व उपहार करितात. लोकांचीं भोजनालयें फार चांगल्या प्रकारें चालतात. सॅनफ्रान्सिस्कोमधील नी लोक फार श्रीमंत आहेत. ह्या धंद्याव्यातिरिक्त इतर धंदे करूनहि, हे लोक पला निर्वाह करितात. कित्येक चीनी लोक कुलीचेंहि काम करितात.

आतां जपानी लोकांची हकीकत सांगतों. अमेरिकेंत जपानी लोक चीनी कांपेक्षां प्रत्येक बाबतींत पुढारलेले आहेत, ह्यांचीं दुकानें बहुतेक सर्व शहरां- आहेत. जपानी लोक अमेरिकेंत जमिनी फार खरेदी करितात; व आपल्या ाहती निर्माण करतात. कॅलिफोर्निया संस्थानांत जपानी लोकांनीं कित्येक लाख लर किमतीच्या जमिनी विकत घेतल्या आहेत. हे लोक ठेक्यानेंहि दुसऱ्यांची में करितात. आपल्या हिंदी लोकांप्रमाणें केवळ मजुरी करूनच हें लोक थांबलें हींत; उलट, हे सर्व प्रकारच्या हस्तकौशल्याचींहि कामें करितात. ज्याप्रमाणें दी लोक नॅटाल, केपकॉलनी वगैरे दाक्षिण आफ्रिकेंतील ब्रिटिश वसाहतींत ाहती करून दुकानें चालवीत आहेत, त्याचप्रमाणें जपानी लोकहि अमेरिकेंत यार्जनाच्या व्यवसायांत गढून गेले आहेत.मी आपल्या प्रवासांत त्यांच्या लहान हान वसाहती पाहिल्या. तालुक्यातालुक्यांतूनहि जपानी लोक घरें बांधून रहात हेत. सर्व भागांत त्यांनीं जमिनी खरेदी केल्या असून जमिनीचें उत्पन्न ते हरांत विकून पैसे मिळवितात. लासएन्जलसच्या सर्व बाजूंस जपानी लोकांची तें पसरलेलीं पाहून मला मोठें आश्चर्य वाटलें.

माझ्या देशबंधूंनीं मनांत आणल्यास त्यांनाहि बरेंच काम करितां येईल. म्हीं आपल्या देशांतून बाहेर पडून जपानी व चीनी लोकांप्रमाणें धैर्यानें

परदेशांत दुकानें उघडलीं पाहिजेत व पुष्कळ द्रव्य मिळविलें पाहिजे. असें आपण केलें, तर आपल्या मायभूमीचें थोडें बहुत पांग फेडल्यासारखें होईल.

**प्रश्न ३६**— थोडया खर्चांत कोणत्या विश्वविद्यालयांत हिंदी विद्यार्थ्यांस विद्यार्जन करतां येईल ?

**उ०**—सर्वसामान्यतः सर्वच विश्वविद्यालयें अल्प मोबदला घेऊन विद्यादानाचें पवित्र कार्य करितात. कोठें कमी कोठें किंचित् जास्त फी द्यावी लागते. पश्चिम भागांतील संस्थानांत फार थोडी फी देऊन विद्यार्जन करतां येतें.

**प्रश्न ३७**—अमेरिकेच्या कोणकोणत्या विश्वविद्यालयांत पोलिटिकल ऍकानॉमी, राजकारण शास्त्र, विज्ञान ( Scince ) इत्यादि विषय चांगल्या रीतीनें शिकविण्यांत येतात ?

**उ०**--हे विषय शिकाविण्याकरतां न्युयार्क, मेडिसन बर्कले, केंब्रिज पालोआल्टो इत्यादि शहरांमध्यें चांगलीं विश्वविद्यालयें आहेत. ह्या विश्वविद्यलयांतून चांगलें विद्वान् अध्यापक वरील विषयांचें शिक्षण देतात. ह्या विश्वविद्यालयासंबंधीं अधिक माहिती हवी असल्यास खालील पत्त्यांवर कार्ड टाकून माहिती-पत्रकें मागवावी.

The Registrar, University of Chicago, Chicago, U. S. A.

The Registrar, Columbia University, New York city, U. S. A.

The Registrar, Harward University, Cambridge, Mass. U. S. A.

The Registrar, University of California, Berkeley Cal. U. S. A.

**प्र० ३८**--पिट्सबर्ग शहरीं जें कार्नेजी विश्वविद्यालय आहे त्यांत हिंदी विद्यार्थी काय शिकूं शकतील ?

**उ०**--कार्नेजी विश्वविद्यालयांत विद्युत, रसायन, व्यापार, धातूचे पत्रें बनाविणें, खानिज पदार्थ आणि आरोग्यरक्षण इत्यादि विषयासंबंधींचें शिक्षण दिलें जातें. लोहार काम, सुतार काम, एंजिन बनविणें, लोखंड वितळविणें लोखंडाचें निरनिराळ्या प्रकारचें पत्रें तयार करणें व अशाच प्रकारचीं इतर

कामेंहि तेथें शिकविण्यांत येतात. ह्या विश्वविद्यालयांतून 'मेकॅनिकल एंजिनियर' वगैरे पदव्या शिकून बांहर पडणाऱ्या यशस्वी विद्यार्थ्यांस देण्यांत येतात.

**प्र० ३९**--अमेरिकेंत काळ्या रंगाच्या लोकांना फार त्रास होतो, असें ऐकतों. कृपा करून ह्या संबंधींचा माहिती सांगावी.

**उ०**—अमेरिकेंत जवळ जवळ एक कोटी हब्शी ( Negro ) लोक आहेत. जबरदस्तीनें आफ्रिकेंतून धरून नेऊन अमेरिकेंत गुलाम म्हणून विकलेल्या हब्शी लोकांचेच हे वंशज होत. ह्यांची पूर्वी शेळयामेंढयाप्रमाणें खरेदी विक्री होत असे. १७८३ मध्यें जेव्हां अमेरिका स्वतंत्र झाली, तेव्हां अमेरिकन लोकांना मनुष्य मात्राच्या हक्कांची जाणीव झाली व तेव्हांपासून हब्शी लोकांना मनुष्यत्वाचें अधिकार मिळवून देण्याकरितां झगडणारे लहान मोठे इसम उदयास येऊं लागले. 'काळ्यागोऱ्यांचे हक्क समान आहेत' असें प्रतिपादन करणाऱ्यांची संख्या हळू हळु वाढूं लागली व अमेरिकेंत काळ्या लोकांच्या हक्कांबाबत वेळोवेळीं नियम करण्यांत येऊं लागले. तरी दक्षिणेकडील संस्थानांत गुलामगिरी कायमच होती. ह्यामुळें सर्व देशांत अस्वस्थता होती व त्यामुळें काळ्या लोकांचें संरक्षण करण्याचें बाबतींत पुष्कळ झगडे उपस्थित होऊं लागले.

सरतेशेवटीं उत्तर व दक्षिण संस्थानांमध्यें एक मोठें घनघोर युद्ध झालें. उत्तर संस्थानांचा जय झाला व हब्शी स्वतंत्र करण्यांत आले. परंतु जित संस्थानीय लोकांचें मनांत गुलामगिरीबद्दलचें पूर्वीचेच ग्रह कायम राहिले. क्रमाक्रमानें त्यांचे विचार बदलत गेले. अजूनहि उपाहारगृहांत काळ्या माणसास उपाहार द्यावयाचें नाकारतात. परंतु एकदां ओळख वगैरे झाल्यावर अमेरिकन लोक आपल्या लोकांशीं चांगल्या रीतीनें वागतात. परंतु हें मीं स्पष्ट सांगून टाकितों कीं, अमेरिकेंत वर्णाचा पक्षपात फार आहे. काळ्या वर्णाच्या आमच्या विद्यार्थ्यांनीं ह्या संकटाला तोंड देण्याला समर्थ असलें पाहिजे. त्यांनीं आपलें धैर्य कमी न होऊं देतां अमेरिकेस जाण्याचें अवश्य करावें. तेथें सामान्यतः बंगाली लोक कृष्ण वर्णाचे असतात. ते हिंमत न सोडतां अमेरिकेस अवश्य जातच असतात.

**प्रश्न ४०**—अमेरिकेंतील वेदान्तसभा हिंदी विद्यार्थ्यांना थोडाफार आश्रय देतात काय ?

**उ०**—होय, ह्या संस्थांपासून थोडाबहुत फायदा आमच्या विद्यार्थ्यांना अवश्य मिळेल; परंतु, अशी मदत देशप्रेमी संन्याशांपासूनच मिळविणें शक्य आहे.

परंतु सर्वच देशप्रेमी संन्यासी नसतात. कांहीं संन्यासी असें असतात कीं, त्यांस आपल्या देशबांधवांसहि भेटावेसें वाटत नाहीं व भेटले तरी ते आपला मोठेपणाचा तोरा सोडीत नाहींत. दोन विभूति मात्र अमेरिकेंत अशा आहेत कीं, ज्या आपल्या हिंदी बांधवांचें सदैव हित चिंतीत असतात व त्यांच्याकरितां अनेक कष्ट सहन करावयास तयार असतात.

संन्यासी मिळो अगर न मिळो, परंतु ज्या अमेरिकन लोकांस वेदांताची चटक लागलेली असते, ते हिंदुस्थानावर प्रेम करीत असतात. ते आपल्या शक्तिनुसार हिंदी विद्यार्थ्यांस विद्यार्जनाकरितां मदत करण्यास सदैव तत्पर असतात. मला केवळ वेदांतामुळें ज्यांनीं आपलेसें करून घेतलें, असे माझे तेथें कित्येक मित्र आहेत.

**प्रश्न ४१**—अमेरिकेंतील थिआसफिकल सोसायट्यांचा भारतीय विद्यार्थ्यांशीं कशा प्रकारचा संबंध आहे?

**उ०**–थिआसाफिकल सभाहि हिंदुस्थानचें नेहमीं हित चिंतीत असतात. ह्या सभांकडून विद्यार्थ्यांना थोडीबहुत मदत होते. माझी अशी समजूत आहे कीं, थिआसाफिकल सभांनीं हिंदुस्थानच्या बाहेर आमच्याविषयीं बरीच सहानुभूति उत्पन्न केली आहे. सॅनफ्रांसिस्कोच्या शेजारीं ओकलँड नांवाचें शहर आहे. ह्या शहरांतील थिआसाफिकल सोसायटीनें आमच्या हिंदी मजूरांना फार मदत केली होती. शिकागोमध्यें मॅडम हावर्ड म्हणून एक फार धर्मशील विदुषी आहे. तिनें ३० वर्षांपासून मांस खावयाचें सोडून दिलें आहे. ही बाई हिंदी विद्यार्थ्यांस नेहमीं मदत करीत असते.

सांगावयाचें तात्पर्य हें कीं, अमेरिकेंतील थिआसाफिकल सोसायट्यांकडून हिंदी विद्यार्थ्यांस बरीच मदत होऊं शकते. परंतु इतके अवश्य लक्षांत ठेवावयास पाहिजे कीं, आमच्या कित्येक मूर्ख बंधूंनीं ह्या सोसायट्यांच्या मदतीचा अयोग्य फायदा घेतल्यामुळें, अमेरिकन सद्‌गृहस्थांना मदत करतांना फार सावधगिरी बाळगावी लागते. ह्याकरितां येथून अमेरिकेस जाणाऱ्यांनीं येथल्या एखाद्या थिआसफिस्ट सद्‌गृहस्थाचें शिफारस-पत्र घेऊन जावें व शिफारस पत्र देणाऱ्यांनींहि आपली जबाबदारी ओळखून शिफारस पत्र द्यावें; कारण, बाहेर जाणाऱ्या इसमांच्या चालचालणुकीवरूनच परदेशस्थ लोक आखिल हिंदु समाजाविषयीं आपली मतें बनवीत असतात.

**प्रश्न ४२**—अमेरिकेंत हिंदी स्त्रियांच्या शिक्षणाची व्यवस्था आहे काय?

उ०–हिंदी स्त्रियांच्या शिक्षणाची सोय अमेरिकेंत कां नसावी? तेथें स्त्रियांकरितां स्वतंत्र शाळा व कॉलेजें आहेत. त्यामध्यें चार पांच वर्षें परिश्रमपूर्वक चांगलें अध्ययन केल्यानें चांगली योग्यता प्राप्त होऊं शकते. तेथें गेल्यानें हिंदी स्त्रिया ख्रिश्चन बनतील, असें समजूं नका; तेथें धर्म शिक्षण न देणाऱ्या बऱ्याच शाळा आहेत. तेथें सर्व जातींच्या कुमारिका विद्यार्जन करतात. अशा शाळांत शिक्षणाकरतां बरेंच द्रव्य लागतें. शंभर रुपये महिन्याच्या खर्चाला मिळाले, म्हणजे शिक्षण चांगल्या प्रकारें होऊं शकतें. अमेरिकेंत कित्येक विद्यार्थिनी स्वावलंबी बनून शिक्षण मिळवितात. हिंदी कुमारिकांनीं स्वावलंबनाच्या जोरावर शिक्षण मिळविण्याच्या उद्देशानें अमेरिकेंत जाऊं नये असें माझें मत आहे, अजून मुलींना अमेरिकेंत शिक्षण संपादण्याकरितां पाठविण्याची वेळ आली नाहीं, असेंहि मला वाटतें. ह्यासंबंधीं माझीं मतें निश्चित आहेत, परंतु त्यांचा येथें निर्देश करणें उचित होणार नाहीं.

**प्रश्न ४३**—अमेरिकन कायदा अमेरिकन लोकांप्रमाणें हिंदी लोकांचें रक्षण करतो काय?

उ०–अमेरिकेंमध्यें सर्व लोकांकरितां एकच कायदा आहे. अमेरिकन कायदा कोणाचाहि पक्षपात करीत नाहीं. कोणाशीं तेथें तंटा झाल्यास वकीलाला जाऊन सांगावें, परंतु फी वगैरेसंबंधीं अगोदर करार करून घ्यावा.

**प्रश्न ४४**–अमेरिकन लोक हिंदी मजूरांचा द्वेष करितात, व कधीं कधीं हिंदी मजुरांस मारहि देतात, असें ऐकण्यांत येतें. ह्यासंबंधीची खरी हकीकत सांगण्याची मेहेरबानी करावी.

उ०—हें खरें आहे, अमेरिकन मजूर हिंदी मजूरांकडे तिरस्कृत दृष्टीनें पाहतात. त्यामुळें मला फार कष्ट सोसावे लागले. बरेचसे मजूर यूरोपियन असतात. युरोपियन नसले, तरी ते अमेरिकन खास नसतात. पॅसीफिक किनाऱ्यावर आमच्या लोकांना फार त्रास सोसावा लागतो. कारण तिकडे आपले चार पांच हजार लोक रहात असून ते पटके बांधतात. त्यांनीं अमेरिकन टोप्या वापरल्या व अमेरिकन मजूरांप्रमाणें वागणूक ठेविली, तर तंटा सहज मिटेल, परंतु ते असें करीत नाहींत. त्यांच्या निरनिराळ्या टोळ्या शहरांत फिरत असतात, व आपल्या विचित्र वागणुकीनें त्या टोळ्या आपण हिंदू असल्याचें सर्वांच्या दृष्टोत्पत्तीस आण-

तात. गोऱ्या मजूरांची अशी समजूत असते कीं, हिंदी मजूर फार थोड्या मजुरीवर काम करतात; व ह्यामुळें त्यांचें नुकसान होतें. ह्याच कारणाकरितां गोरे मजूर व हिंदी मजूर ह्यांमध्यें तंटे होत असतात. ज्यांना शांतपणें राहून आपला निर्वाह करावयाचा आहे त्यांनीं अमेरिकन लोकांप्रमाणेंच चालचणूक ठेविली पाहिजे. त्यांनीं लागेल तर मांस खाऊं नये परंतु राहणें सवरणें व पोषाख अमेरिकन लोकांप्रमाणें करावयास पाहिजे. असें केलें तरच आपल्याकडे पाहून कोणी बोटें मोडणार नाहींत. पटके बांधण्याचें सुरू ठेविल्यास मात्र मुलें आपल्याला पाहून टाळ्या वाजवितील व आपली चेष्टा करतील.

**प्र० ४५**—अमेरिकन लोकांचा धर्म कोणता?सर्व लोक ख्रिश्चन तर नाहींत ना?

**उ०**—सर्वच अमेरिकन ख्रिश्चन नाहींत. स्वतंत्र विचार करणारे तेथें बरेच लोक आहेत. ते 'ईसा'ला फार चांगलें समजतात. इतर धर्मांच्याहि ग्रंथाचें ते अध्ययन करितात. कांहीं लोक निःपक्षपाती आहेत. त्यांना सर्व धर्मांतील चांगला चांगला भाग ग्राह्य वाटतो, तर उलट कांहीं फार जहाल असून आपल्या धर्माचे कट्टे पुरस्कर्ते आहेत. हे लोक स्वार्थी असून ह्यांची वागणूक तीन शतकांपूर्वींच्या धर्मवेड्या यूरोपियनांप्रमाणें असते. कांहीं खऱ्या भावनेनें ईसाला परमेश्वर समजतात; परंतु अश्या श्रद्धावान् लोकांची दिवसेंदिवस संख्या कमी कमी होत जात आहे. बऱ्याच लोकांनीं बायबलांतील शब्दांच्या अर्थविवरणाकरितां हल्लींच्या परिस्थितीचा विचार करून विस्तृत टीपा लिहिल्या आहेत. अशा प्रकारें आपला जहाल धर्मभोळेपणा टाकून देऊन विश्वव्यापक धर्माशीं संबंध असलेल्या शेलक्या तत्त्वांचाच त्यांनीं अंगिकार केला आहे. ते आपल्याला निरनिराळ्या धार्मिक ग्रंथांचे अभिमान बाळगणारे समजतात. कोणी ख्रिश्चन साइंटिस्ट, कोणी न्युथॉट, कोणी स्पिरिच्युआलिस्ट, कोणी ख्रिश्चन सोशियालिस्ट इत्यादि नांवानें संबोधले जातात. देशांतील सद्यःकालीन गरजा ज्या मार्गानें भागवितां येतील, त्या बाबींकडे सर्वांचें सारखेंच लक्ष लागलेलें असतें. अर्थात् सर्व धर्मांतील ग्रंथ वाचून आपल्या परिस्थितीला योग्य तो उपदेश त्यांमधून ते ग्रहण करितात.

अमेरिका हा एक प्रमुख साक्षर देश आहे. साक्षर देशाचा धर्महि त्या देशांतील शिक्षणपद्धतीवर अवलंबून असणार. ह्यामुळेंच विकास–सिद्धांताला ( Evolution Theory ) धरून त्यांचा धर्म असून, परिस्थितीनुसार त्यामध्यें रूपांतर घडत जातें. ज्या वेळीं ज्या धार्मिक बंधनांची गरज वाटत

सल त्यांचा त्याग करून नवीन धार्मिक किंवा सामाजिक बंधनांचा ते
ीकार करतात.

प्र० ४६--अमेरिकेंत सर्व प्रकारचीं फळें मिळतात काय ?

उ०--आंब्यांशिवाय सर्व जातींचीं फळें अमेरिकेंत मिळूं शकतात. शेव,
तरी, नाशपाती ही फळें फार चांगल्या दर्जाची मिळतात. संत्री फार गोड व
जरहित असतात. अशा प्रकारच्या संत्र्याला 'नेवल' असें म्हणतात. फलाहार
रून राहूं इच्छिणाऱ्या इसमांनीं अगदीं निश्चिंत असावें. अमेरिका फळांचें माहेर
रच आहे. तेथें कोणत्याहि संस्थानांत राहिलें तरी फळें मिळण्यास मुष्कील
डत नाहीं व किंमतही जवळ जवळ सर्व ठिकाणीं सारखींच पडते. आपल्या
शांतल्याप्रमाणें येथें नाहीं. पंजाबांत फळें रगड तर इतर प्रांतांत फळें मिळणें
ुष्किलीचें होतें व फळें मिळालीं, तरी फार महाग मिळतात.

प्र० ४७--अमेरिकेंतील राज्यपद्धति कशा प्रकारची आहे.

उ०--अमेरिकेच्या संयुक्त संस्थानांचीं राज्यपद्धति प्रजासत्ताक स्वरूपाची
ाहे. अमेरिकन लोक आपल्या प्रजासत्ताक देशाचा राजा ( अध्यक्ष ) आपणच
नवडतात. कोणाहि राजवंशीय इसमांची अध्यक्षाचें जागीं निवड करण्यांत येत
ाहीं. योग्यतेनुसार मोठ्या अधिकाऱ्यांच्या जागा देण्यांत येतात. ह्यासंबंधींची
ाधिक माहिती हवी असल्यास एखादें इंग्रजी पुस्तक वाचावें. प्रस्तुत स्थळीं ही
ाहिती अधिक विस्तारपूर्वक देतां येत नाहीं.*

प्र० ४८--आपण अमेरिकेसच जाण्याचा आग्रह कां करितां? जर्मनी, जपान,
फ्रान्स वगैरे सारख्या देशांत जाऊनहि विद्यार्जन करतां येत नाहीं काय ?

उ०--इतर देशांतहि जाऊन आपले विद्यार्थी विद्याभ्यास करूं शकतात.
आमचे विद्यार्थी जपानला जातात व एखादी कला किंवा विद्या शिकून स्वदेशीं
रत येतात व चैन करतात.जपानहून कित्येक तरुण शिकून आले असून गिरण्यां-
ून कामें करीत आहेत हें जरी खरें आहे तरी, माझ्या मतें.आपल्या तरुणांनीं
अमेरिकेसच विद्याभ्यासाकरितां जाणें अधिक श्रेयस्कर आहे. कारण, अमेरिकेंत
इंग्रजी भाषा प्रचलित असल्यामुळें भाषेची अडचण पडूं शकत नाहीं. ह्यामुळें आपले

---

* 'अमेरिका दिग्दर्शन' पुस्तकांतील परिशिष्टांत अमेरिकेची शासन-
पद्धति देण्यांत येईल.

विद्यार्थी फार लवकर विद्या ग्रहण करूं शकतात. फ्रान्स, जर्मनी, जपान इत्यादि देशांत पहिली अडचण भाषेची पडते व भाषा शिकण्यांतच वर्ष सहा महिने घालवावे लागतात. दुसरें असें कीं, ह्या देशांतून निर्धन विद्यार्थ्यांस विद्याभ्यास करण्यास अवसर मिळत नाहीं. श्रीमान आईबापांची मुलेंच तेथें शिकूं शकतील. अमेरिकेंत निर्धन विद्यार्थ्यांस द्रव्यार्जन करण्याची संधि मिळते.व आमचे विद्यार्थी बहुतांशीं निर्धनच असतात. ह्याकारितां त्यांनीं अमेरिकेसच जाणें युक्त आहे.

शिवाय अमेरिकेंतील विशेष हा कीं, तेथें प्रत्येक बाबतींत झपाट्यानें सुधारणा घडून येत आहे. तेथें जाऊन केवळ द्रव्यार्जन करीत असतांच डोळे व कान सदोदित उघडे ठेविले, तरी बरेंच ज्ञान संपादन करतां येईल. मानवसमाजासंबंधींचे मोठमोठे महत्त्वाचे प्रश्न आज त्यांचें समोर आहेत. तेथें राहिल्यानें आपलें भावी आयुष्य सुखमय करण्यास लागणारी साधनसामुग्री हिंदी तरुणांस गोळा करतां येईल. जो प्रश्न आज आमच्या समोर आहे व ज्या सामाजिक निर्बलतेचा विचार मनांत आला कीं, चित्त व्यग्र होतें, ह्या अडचणी दूर करण्याचें साधन आपणांस अमेरिकेपासूनच मिळविलें पाहिजे. तेथें राहून मी कठींणांतलें कठीण काम करूं शकेन असा आत्मविश्वास वाटावयास लागतो, त्याला स्वतःवर अवलंबून राहण्याची संवय लागते व मग त्यांस मोठमोठे प्रश्नहि गांगरून सोडीत नाहींत.

**प्र० ४९**—अमेरिकेंत कृषिविद्येचें शिक्षण मिळविण्याकारितां कोणते विश्वविद्यालय चांगलें आहे ?

**उ०**—अमेरिकेंतील कित्येक विश्वविद्यालयांमध्यें कृषि शिकविण्याची उत्तम व्यवस्था आहे. विसकॉन्सिन ( Wisconsin ) विश्वविद्यालय कृषि शिक्षणाकारितां फारच चांगलें आहे. तेथील अधिक माहिती हवी असल्यास खालील पत्यावर लिहावें:—

The registrar,
Wisconsin University
Madison Wis. U. S. A.

पश्चिम भागांतील संस्थानांत कृषि शिकाविण्याची उत्तम सोय आहे. बर्कले येथील कॅलिफोर्निया युनिव्हर्सिटी ह्याकरितां फार चांगली आहे. ही युनिव्हार्सिटी सॅनफ्रान्सिस्को बंदराशेजारी असून तेथें बरेंच हिंदी विद्यार्थी

शिक्षण घेत आहेत. कृषि शिक्षण मिळविणाऱ्यांनीं ह्या विश्वविद्यालयाच्या रजिष्ट्रारला लिहून प्रथमपासूनच सर्व विचारपूस करून घ्यावी.

प्रत्येक संस्थानच्या विश्वविद्यालयांत कृषि शिकविण्याची व्यवस्था आहे. आमचे विद्यार्थी बंधू ज्या संस्थानांत जातील, तेथें त्यांस विश्वविद्यालय आढळेल व त्यांत त्यांना त्यांच्या अभिरुचिनुसार विद्याभ्यास करतां येईल. सर्वच संस्थानांत उत्तम उत्तम युनिव्हर्सिटया आहेत. परंतु कृषिशिक्षणाकरितां पश्चिम भागांतील संस्थांनांत जाणें उचित आहे. कारण हा भाग कृषीचें माहेरघरच आहे व ह्या भागांतील हवाहि विशेष थंड नाहीं.

**प्र० ५०**–कृषिसंबंधी सूचना मागवावयाच्या असल्यास कोणाशीं पत्र-व्यवहार करावा ?

**उ०**–वाशिंग्टन डी. सी. शहरामध्यें एक मोठा सरकारी कृषि विभाग आहे. त्या विभागातर्फे एक डायरेक्टरी छापली जाते. अमेरिकन यंत्रांचा कॅटलागहि Director of the Interior ला लिहिल्यानें मिळूं शकतो. ज्यांना कृषि-संबंधी कांहीं माहिती विचारावयाची असेल त्यांनीं

The Director,
Agricultural Department
Washington D. C. U. S. A.

ह्या पत्त्यावर विचारपस केल्यास त्यांना योग्य सूचना मिळं शकतील.

**प्र० ५१**–कॅलिफोर्निया संस्थान पश्चिम भागांत आहे. ह्या संस्थानांतिल हवा पाणी कसें आहे ? अमेरिकेच्या इतर भागांचेहि हवापाणी कसें काय आहे, हें सांगण्याची कृपा करावी.

**उ०**—कॅलिफोर्नियाची हवा फार थंड नाहीं. त्यावरून तेथें थंडीच नसतें असें अनुमान करणें चुकीचें होईल. कारण हिंवाळ्यांत तेथेंहि बरीच थंडी असते. कॅलिफोर्नियाच्या उत्तर भागांत बर्फहि पडतें. परंतु दाक्षिण भागांतील हवा कांहीं अंशीं पंजाबच्या हवेप्रमाणें आहे. ऑरेगान संस्थानांतहि फार थंडी नसते. दाक्षिणेकडील संस्थानांत केवळ नांवालाच बर्फ पडतें. तेथें उष्णताहि बरीच असते. ऑरेगान व कॅलिफोर्नियाच्या दाक्षिणेकडील कांहीं भागांत उन्हाळ्यांत फारच उकडतें.

पूर्व व उत्तर भागांतील संस्थानांत बर्फ फार पडतें. पश्चिम भागाच्या मध्य-भागांतहि बर्फ फार पडतें. शिकागोमध्यें डिसेंबर किंवा जानेवारीमध्यें पारा –१०° ते–२०° पर्यंतहि असतो तर उलटपक्षीं उन्हाळ्यांत सूर्यनारायण आपल्या प्रखर उष्णतेनें ही कसर भरून काढतात. परंतु येथें वर्षांतील बरेच महिने थंडीचे असतात, म्हणून अमेरिका हा शीत-प्रधान आहे, असें म्हणतात. न्यु इंग्लंड हें संस्थान थंडीकरितां प्रसिद्ध आहे. मध्यपश्चिम भागहि हिवाळ्यांत बर्फाचें अधिष्ठान बनतो. पश्चिमेकडील कॅलिफोर्निया व ऑरेगान ह्याच संस्थानांत थंडी फारशी नसते. उत्तर पूर्व भागांत मात्र थंडी अतीशय असते.

परंतु हवा कोरडी राहत असल्यामुळें हिंवाळ्यांत अन्नाला बरीच रुचि असते. येथील हवापाणी गुणकारी आहे. थंडीचें नांव ऐकून कोणी भिऊन जाऊं नये. मीं शिकागोंत राहिलों आहे. रात्रीं बारा वाजतां ऐन थंडीच्या भरांतहि स्केटींगचा खेळ पहाण्यास मीं जात असे. असें करतांना मला फार मौज वाटत असें. ह्यासमयीं चेहऱ्याशिवाय दुसरा कोणताहि दुसरा शरीराचा भाग उघडा ठेवतां येत नाहीं. सर्व शरीर झांकलेलें असतें. हिंवाळ्यांत जमीनीवर सांचलेल्या बर्फावर चांदण्यारात्रीं अमेरिकन युवक व युवति स्केटींगचा खेळ खेळतात, तेव्हां फार मौज वाटते. सारांश, अमेरिकेची हवा निरोगी असून बलवर्धक आहे.

**प्र०**––अमेरिकेंत असलेले शीख लोक तेथें काय करीत असतात ?

**उ०**––अमेरिकेंत जाणाऱ्या हिंदी लोकांत पंजाबच्या रहिवाश्यांचा बराच भरणा असतो. ह्याचें कारण, असें कीं, हाच प्रांत सोंवळ्या ओंवळ्याच्या कल्पनांपासून मुक्त आहे. हे पंजाबी शीख मजुरी करितात. ह्यापैकीं कांहीं लोक लांकडे कापण्याच्या गिरण्यांतूनही कामें करितात. बरेच लोक शेतकऱ्यांकडे नोकर असतात. बरेच शीख लोखंडाच्या खाणींत कामावर असतात. कांहीं शीख उन्हाळ्यांत फळांच्या बागेंत काम करतात व बाकीच्या दिवसांत घरीं स्वस्थ बसून असतात. कांहीं शीखांनीं जमीनी खरेदी केल्या असून ते तेथें सहकुटुंब राहत असतात.

परंतु दुःखाची गोष्ट ही कीं, शिकलेले हिंदी लोक तेथें जात नाहींत. ज्यांना व्यापार कसा करावा, हें मुळींच माहीत नाहीं, ते लोक तेथें व्यापार करण्याकरितां जातात.ह्यामुळें त्यांना चांगला फायदा होऊं शकत नाहीं. आमच्या

देशांतील मारवाडी, बनिये, खत्री, खोजे, सिंधी वगैरे लोकांनीं अमेरिकेंत जाऊन पुष्कळ द्रव्य मिळविलें पाहिजे.

**प्र० ५३**--अमेरिकेंतील नाण्यासंबंधींची माहिती सांगण्याची कृपा करावी.

**उ०**--अमेरिकेंतील नाण्याला 'डॉलर' ही संज्ञा आहे. हा रुपयापेक्षां बराच मोठा व जड असतो. ह्याची किंमत साधारणतः तीन रुपये दोन आणे असते. (हल्लीं शंभर डालरची किंमत अजमासें २७५ रुपये होते.) डॉलरचे शंभर सेंन्ट्स असतात, सेंट हे आपल्याइकडील पैशाच्या स्वरूपाचें नाणें आहे. एक सेंटची किंमत आपल्याइकडील सुमारें दोन पैशांइतकी होतें. डॉलरची छोटीं छोटीं नाणीं अर्धा डॉलर, क्वार्टर, डाईम, निकल इत्यादि असतात एक निकल पांच सेंटाबरोबर असून त्याची किंमत अडीच आणे असते. क्वार्टर पंचवीस सेंटबरोबर अर्थात् १२॥ आणे किंमतीचा असतो. क्वार्टरला 'टू बिट्स' हि (Two Bits) म्हणतात. डाईम नाणें दहा सेंट किंमतीचें असतें.

एखाद्या माणसास तीन डॉलर मजुरी मिळत असल्यास आपल्या इकडील हिशोबानें त्याला ९ रु. ६ आणे मिळतात असें समजावें.

**प्र० ५४**—अमेरिकेचें पोस्टाचे दरहि कळविण्याची मेहरबानी करावी.

**उ०**—अमेरिकेला पाकीटांतून पत्र पाठवावयाचें असल्यास पाकीटावर तीन आण्याचीं तिकीटें लावली पाहिजेत. कार्ड पाठवावयाचें झाल्यास त्यावर एक आण्याचें तिकीट लाविलें पाहिजे.

**प्र० ५५**—कोणाला अमेरिकेकडून पुस्तकें मागवावयाची असल्यास त्यानें काय करावें ? कारण तेथें व्ही. पी. ची पद्धति नाहीं. असें आम्ही ऐकितों.

**उ०**—अमेरिकेमध्यें व्ही. पी. ची पद्धति नाहीं. पुस्तकें मागावयाची झाल्यास प्रथम चांगली विचारपूस करून नंतर मागवावीं. पुस्तकें विकणाऱ्या ज्या प्रसिद्ध कंपन्या असतात त्यांच्याशीं ह्याकरितां पत्रव्यवहार करावा. उदाहरणांर्थ Library of Oratory ची पुस्तकें मागवावयाचीं झाल्यास खालील पत्त्यावर कार्ड टाकून सूचीपत्र मागवून घ्यावें.

The Warner Company,
Akron, Ohio, U. S. A.

कोणकोणत्या पुस्तकांच्या किंमती उतरल्या आहेत हेंहि विचारून घ्यावें; म्हणजे आपल्या इच्छेप्रमाणें पुस्तकें मागविण्यास ठीक पडेल; शिकागोंत एक दुकान आहे. त्याचा पत्ता असा—

The book supply Co.
266–268 Wabas Ave,
Chicago, Ill, U. S. A.

ह्या दुकानांत सर्व प्रकारचीं पुस्तकें मिळतात. एक पोस्टकार्ड टाकलें असतां येथील सूचीपत्र मिळूं शकतें. प्रथम सूची–पत्र मागवून किंमती पाहून घ्याव्या, नंतर त्या प्रमाणें पैसे पाठवून पुस्तकें मागवावीं. एखादें मॅगेझिन मागवावयाचें झाल्यास ह्या कंपनीच्या द्वारेंच मागवावें. ह्या कंपनीच्या सूची--पत्रांत अमेरिकें-तील मॅगेझिन्सचीं नांवें व त्यांच्या किंमती दिलेल्या असतात. ज्यांच्या किंमती कमी करण्यांत आलेल्या असतील त्यांची नांवें व त्यांच्या नवीन किंमतीहि दिलेल्या असतात.

अर्थात् पुस्तकें मागवूं इच्छिणाऱ्या इसमानें प्रथम अमेरिकेहून सूची–पत्र मागवायास पाहिजे. मॅगेझिन प्रसिद्ध करणाऱ्याकडूनच मॅगेझिन मागवावयाचें असल्यास मात्र सूची–पत्र मागविण्याची जरूरी नाहीं,

**प्र० ५६**––अमेरिकेंतील चांगल्या चांगल्या वर्तमान पत्रांचीं नांवें त्यांचीं वार्षिक वर्गणी व तीं जेथें प्रसिद्ध होतात तीं ठिकाणें इत्यादि विषयींची माहिती कळविण्याची मेहेरबानी करावी.

**उ०**––हे घ्या, अमेरिकेंतील चांगलीं चांगलीं वर्तमानपत्रें व मासिकें, त्यांचीं प्रसिद्ध होण्याचीं ठिकाणें व त्यांच्या वार्षिक वर्गणीचे दर ( वगैरे ) सर्व माहिती आपणांस सांगतों:––

| नांव. | मासिक कीं साप्ताहिक. | प्रसिद्ध होण्याचीं ठिकाणें. | वार्षिक वर्गणी. |
|---|---|---|---|
| Current Literature | मा | New York City N. Y. U. S.A. | तीन डॉलर ,, |
| World's Work | मा | ,, | ,, |

| | | | |
|---|---|---|---|
| Literary Digest | सा | „ | तीन डॉलर |
| Twentieth Century Magazine | मा | Bostno Mass, U. S. A. | „ |
| Munsey Magazine | मा | New York City | एक डॉलर |
| American Magazine | मा | „ | दीड „ |
| Farmer's Review | सा | Chicago | एक „ |
| Garden Magazine | मा | New york City | „ „ |
| Electrical Review | सा | „ | तीन डॉलर |
| Engineering Magazine | मा | „ | „ „ |
| Education | मा | Boston | „ „ |
| Kindergartan Magazine | मा | New York City | एक „ |
| „ Review | मा | Springfield N. Y. U. S. A. | „ |
| Ohio Educational Monthly | मा | Akron (Ohio) | „ |
| Popular Eeucation | मा | Boston | „ |
| Primary , | मा | „ | „ |
| School and home Education | मा | Philadelphia | सवा „ |
| Little Folks | मा | Salem (Mass) | एक „ |
| मुलांकरितां— | | | |
| Youth's Companion | सा | Boston | पावणे दोन „ |

वाचकांकरितां इतकीं नांवें पुरेशी होतील. वर्गणीच्या दरांत टपाल हंशीलाचा खर्च धरण्यांत आलेला नाहीं, हें लक्षांत ठेवावयास पाहिजे.

प्र० ५७—कित्येक लोक येथें राहूनच अमेरिकेच्या पदव्या पटकावितात, ही काय भानगड आहे हें सांगण्याची कृपा व्हावी.

उ०—अमेरिकेंत धूर्त लोकांनीं फसविण्याकरितां अशा प्रकारच्या कांहीं शाळा उघडल्या आहेत. अमेरिकेंतील विश्वविद्यालयें अशा शाळा व कॉलेजांना मान्यता देत नाहींत. परदेशस्थ लोक मात्र ह्या संस्थांच्या जाळ्यांत सांपडून

प्र० ६०--अमेरिकेस न जातां येथेंच राहून कांहीं शिकावें, अशी आमची इच्छा आहे ह्याकरितां काय करायला पाहिजे ?

उ०—आपल्याला राजकारणशास्त्र, विज्ञान, समाज-शास्त्र, साहित्य-शास्त्र, इतिहास इत्यादि विषय शिकावयाचें असल्यास आपण खालील पत्त्यावर लिहावें:-

The University of Chicago,
Correspondence Study Dept,
U. of C. ( Div T. ) Chicago, Ill., U. S. A.

आपल्याला कृषिशिक्षण घ्यावयाचें असल्यास खालील पत्त्यावर लिहावें—

The Home Correspondence School,
185 Spring field Mass, U. S. A.

सुतार काम किंवा घर बांधण्याचें काम शिकावयाचें असल्यास खालील दिलेल्या पत्त्यावर पत्र व्यवहार करावा.

The American School of Correspondence,
Chicago Ill U. S. A.

प्र० ६१—कोणते शिक्षण घेण्याकरितां हिंदी विद्यार्थी अमेरिकेस गेल्यास आपल्या देशाचा अधिक फायदा होईल, असें आपणांस वाटतें ?

उ०—हा प्रश्न फार महत्वाचा आहे. व ह्या बाबतींत बराच मतभेद दिसून येण्याचा संभव आहे. माझ्या मतें अमेरिकेस जाऊन अमेरिकेंतील शिक्षणपद्धतींचें शिक्षण मिळविलें पाहिजे. हा विषय शिकविणारे चांगलें चांगलें विद्वान अध्यापक कोलंबिया युनिव्हर्सिटींत आहेत. तेथें जाऊन आमच्या विद्यार्थ्यांनीं चार पांच वर्षे परिश्रमपूर्वक ह्या विषयाचें शिक्षण संपादन केलें पाहिजे.

ह्या व्यतिरिक्त अर्थशास्त्र, राजकारणशास्त्र, व्यापार उदीमसंबंधीं विद्या, बँकिंग इत्यादि विषयांचें अत्यंत परिश्रम करून शिक्षण मिळविल्यास आपल्या देशाचा फार फायदा होईल. आम्हांस मोठमोठ्या व्यापारी मंडळ्या स्थापन करावयाच्या असल्यास असल्या मंडळ्या चालविण्याची पात्रता शिक्षणाच्या संस्कारानें आपल्या अंगीं बाणविली पाहिजे. आमच्यामध्यें एक प्रमुख दोष हा कीं, आम्ही संघशक्तीचें ( Organization ) महत्व जाणत नाहीं. यदाकदाचित् आपल्यापैकीं कोणास हें महत्त्व कळलें असलें तरी त्याप्र-

आपल्या धनाची नासाडी करितात. हिंदी लोकांनीं अशा शाळा कॉलेजांपासून सावध असावें. अमेरिकेंत असें धोके देणारे बरेंच लोक आहेत. कारण अमेरिका हा एक स्वतंत्र देश असून सर्व लोकांस तेथें मुक्तद्वार आहे. ह्यामुळें युरोपांतील डाकू, चोर, गळेकापू, धूर्त सर्वच लोक अमेरिकेस जाऊन लपून छपून आपले उद्योग चालवितात व तेथील सुरक्षितपणाचा नसता फायदा घेतात.

माझ्या हिंदी देशबंधूंना माझी अशी विनंति आहे कीं, त्यांनीं अशा पत्र-व्यवहारी शाळा व कॉलेजांपासून सावध असावें. हिप्नॉटिझम वगैरे विद्या शिकण्याच्या चक्करांत पडून कित्येक आपले पैसे फुकट घालवितात. अमेरिकेंतील अशा प्रकारच्या संस्था अगदीं कुचकामाच्या असून, अशा संस्थांना तेथें कोणी विचारीत देखील नाहींत.

प्र० ५८—युरोपांतील लोक अमेरिकेस जाऊन अमेरिकन बनतात, हें कसें? हिंदी लोकहि अमेरिकन होऊं शकतात काय?

उ०—अमेरिकेंत गेल्यावर अमेरिकन व्हावेंसे वाटल्यास कोर्टांत आपली अमेरिकन होण्याची इच्छा असल्याचें सांगावें. म्हणजे त्याला तशी इच्छा असल्याबद्दलचा एक कागद देण्यांत येतो. ह्या इच्छा-पत्राकरितां एक डालर खर्च करावा लागतो. ह्या कागदाला 'पहिला-कागद' (First Paper) म्हणतात. पांच वर्षांनंतर दोन अमेरिकन साक्षीदारांच्या सह्या घेतल्यावर तो कागद सरकारी कचेरींत सादर करण्यांत येतो. असें केल्यावर पक्का कागद मिळतो. परंतु पांचव्या वर्षीं एकाच संस्थानांत राहावयास पाहिजे. असें केलें, तरच तो त्या संस्थानचा रहिवाशी म्हणविला जातो. बहुतेक युरोपियन लोक तेथें गेल्याक्षणींच पहिला कागद मिळवून घेतात. असें केलें म्हणजे नोकरी मिळविण्यास त्यांस अडचण पडत नाहीं. फौजेंतहि त्यांचा प्रवेश सहज होऊं शकतो.

प्र० ५९–अमेरिकेच्या दान-विभागासंबंधींची माहिती कळावी अशी आमची इच्छा आहे; म्हणून अमेरिकन लोक दानाचा उपयोग कसा काय करतात ह्या संबंधीची माहिती सांगण्याची कृपा करावी.

उ०—आपल्याला ही माहिती खालील ठिकाणाहून मिळेल—

Charities Publication Committee
105 East, 22 nd St. New York City.

मार्णे त्यांची वर्तणूक दिसून येत नाहीं. आमचे कित्येक हिंदी तरुण अमेरिका-जपानहून परत आले आहेत. त्यांच्यावर लोकांचा असा आक्षेप आहे कीं, त्यानीं स्वदेशांत येऊन कांहींच कामगिरी केली नाहीं. परंतु काम करून दाखविण्यास भांडवलाची किती आवश्यकता असतें, हें त्यांस माहीत नाहीं, असें ह्यावरून दिसतें. भांडवलवाल्यांची अशी समजूत आहे कीं, विद्या–कला शिकलेल्या इसमालाच व्यापारी कंपनी चालविण्याचें देखील ज्ञान असतें. परंतु ही फार मोठी चूक आहे. कंपनी चालविण्याची विद्या अगदीं स्वतंत्र आहे. धंद्याची विद्या व कंपनी चालविण्याची विद्या दोन्हीं एकच आहेत अशा समजुतीमुळें लोकांचा बराच गैरसमज झालेला आहे. जो मनुष्य कांचकाम शिकून आला आहे किंवा जो रसायन शास्त्राचें उत्कृष्ट शिक्षण संपादन करून आला आहे, त्याला कंपनी उत्तम प्रकारें चालवितां येत नाहीं; व ह्या तरुण मंडळींचा संबंध येथें ज्यांनीं हाडांचीं काडें करून धन मिळविलें आहे, त्यांच्यांशीं येतो. अर्थात् हे धनिक लोक कशाला आपलें धन अशा परिस्थितींत धोक्यांत घालतील. ह्याकरितां हिंदुस्थानांतील धनिक लोकांनीं पाश्चात्य संघशक्तीचें शिक्षण मिळवून, जपान अमेरिकेहून निरनिराळ्या विद्या व कला शिकून आलेल्या हिंदी तरुणांशीं सहकार्य केलें पाहिजे.

ह्याचकरितां हिंदुस्थानांतलि श्रीमंत तरुणांनीं अमेरिकेस जाऊन अर्थशास्त्र. व्यापारशास्त्र, इत्यादि संपत्तिविषयक शास्त्रांचा अभ्यास केला पाहिजे. ह्या विषयांत जेव्हां ते ( श्रीमंत तरुण ) पारंगत होतील तेव्हांच ते विद्या व कलांचें शिक्षण मिळवून आलेल्या इतर तरुण देशबांधवांबरोबर सहकार्य करूं शकतील व अशा रीतीनें देशाचा बराच फायदा त्यांना करून देतां येईल; नाहींतर एकावरच दोन्ही जबाबदाऱ्या टाकल्यास काम करणें तितकेंच अवघड होऊन बसेल.

आतांपर्यंत बड्या बड्या धंद्यांच्या व शास्त्रांच्या शिक्षणाविषयीं आपण विचार केला, परंतु अमेरिकेंत जाऊन अनेक लहान लहान परंतु व्यवहारांत हरघडी उपयोगी पडणाऱ्या कलांचें शिक्षणहि–जोडे, छत्र्या, चाकू, पेन्सिल, ट्रंक, सूटकेस, सायकल, मोटार इत्यादि कलांचे शिक्षण–मिळवितां येईल. आणखी किती लिहावें ? सुतार–काम, लोहार–काम, गवंडी–काम, डिझायनिंग, पंपींग इत्यादि बाबींच्या शिक्षणाची किती तरी जरूरी आहे. केवळ मॅक-

निकल एँजिनियरिंग हा एकच विषय घेतला तरी त्यांत खालीं दिलेल्या अनेक पोट विषयांचा समावेश होतो.

Machine Shop work-Vertical Milling Machine Motor driven shops-Shop Lighting-Forging-Eletrical Welding-Tool Making Metallurgy-Manufacture of Iron and Steal-High Speed Steal Making-Pattern Making-Founding Work-Automatic caol and ore Handling Appliances-Construction of Boilers-Air Compressing Steam Pumping-Refregirating-Gas Engine Making-Automobile Making Machine Disigning etc.

ह्यावरून मला इतकेंच दाखवावयाचें आहे कीं, एक विषय घेतला तरी त्यांत किती तरी पोट विषय शिकावे लागतात. माझ्या मित्राची एक हकीकत सांगतों. त्याच्या मोटारीचा काहीं भाग बिघडला होता. तो भाग त्याला साऱ्या हिंदुस्थानांत मिळाला नाहीं. अखेर ती मोटार दुरुस्त करण्याकरितां त्याला पॅरिसला पाठवावी लागली. ही आहे आमच्या देशाची स्थिति !

सांगावयाचा मतितार्थ हा कीं, अमेरिकेस जाऊन एखादा मोठा धंदाच शिकावयास पाहिजे असें नाहीं; एखादें लहानसें काम शिकून आलें तरी बरेंच काम होईल, कारण हस्तकौशल्याची कला, विद्या इत्यादि हरएक बाबतींत अमेरिकन लोक आपल्यापेक्षां बरेंच पुढारलेले आहेत.

ह्या शिवाय कृषि विद्येच्या शिक्षणाचीहि बरीच आवश्यकता आहे. अमेरिकन कृषिमध्यें बरीच सुधारणा व प्रगति घडून आली आहे. तेथें जाऊन आमचे हिंदी तरुण कृषि विषयक मोठमोठ्या सिद्धांतांचें ज्ञान चांगल्या रीतीनें प्राप्त करून घेऊं शकतील. फळांचे निरनिराळे टिकाऊ पदार्थ बनविण्याच्या यंत्रागारांत शिक्षण मिळवून आपल्या देशांत आल्यावर त्यांना फळांचा व्यवसाय करतां येण्यासारखा आहे. हिंदुस्थानांत कोट्यावधि रुपयांचे आंबे होतात. अमेरिका व युरोपांतलि पदार्थ टिनच्या डब्यांतून ज्या प्रमाणें हिंदुस्थानांत पाठविण्यांत येतात,त्या प्रमाणें हिंदुस्थानांतील फळफळावळ डब्यांतून परदेशांत पाठविलें पाहिजे. परंतु हिंदुस्थानांतील फळें हिंदुस्थानांतच सडून जातात. लाहोराहून कलकत्त्यापर्यंतहि चांगल्या रीतीनें पोहोचवितां येत नाहींत. वाटेंतच फळें सडून त्यांचें पाणी होतें. कांहीं फळें मुक्कामास पोहोंचेपर्यंत चांगलीं

राहिलीं तर मोठें नशीब समजावें! अमेरिकेंत 'Refringator'चा (बर्फाच्या गाड्यांचा) फळें वाहून नेण्याच्या कामीं उपयोग करितात. ही पद्धति हिंदुस्थानांतहि सुरू करतां येण्यासारखी आहे. ह्या गाड्यांतून कोट्यावधि रुपयांची फळें एका किनाऱ्यापासून अमेरिकेच्या दुसऱ्या किनाऱ्यापर्यंत नेण्यांत येतात; तरी तीं फळें सडत नाहींत. असें आपणांला करतां येणार नाहीं काय ? विद्या व उद्योग ह्यांची सांगड घातल्यास असें कां बरें करतां येणार नाहीं ?

प्र० ६२—हिंदी विद्यार्थ्यांना सांगण्यासारखी आणखी कांहीं महत्वाची बातमी सांगावयाची राहिली आहे काय ?

उ०—अमेरिकेंतील 'हिंदुस्थान स्टूडंट्स असोसिएशन'नें अमेरिकेंत 'शिक्षा' ह्या नांवाचें एक छोटेंसें पत्रक प्रसिद्ध केलें आहे. त्यांतील महत्वाचा कांहीं भाग अमेरिकेस जाऊं इच्छिणाऱ्या विद्यार्थ्यांच्या सोईकरितां जशाचा तसा ह्याच पुस्तकांत ह्यापुढें उद्धृत केला आहे. ह्यापासून हिंदी विद्यार्थ्यांना महत्वाची बरीच माहिती मिळेल अशी आशा आहे.

---

## American System of Education.

There are about 600 universities and collges in the United States. Most States of the Union maintain a State University, which is usually located at a distance from crowded cities. Besides the State Universities there are universities maintained by the income of private endowment. Michigan, Minnessota, Wisconsin, Illinois, California are State Universities, while Yale, Harvard, Columbia, Cornell, Princeton, Chicago, and Stanford are private universities. Of all these universities, about 23 are of the first grade. These have faculties of liberal arts, sciences, engineering, agriculture medicine, law.

Most of the colleges, as distinguished from the universities, have only the faculties of arts and sciences. But there are colleges of medicine and colleges of engineering and several states have separate colleges of agriculture. Massachusets Institute of Tuchnology generally known as " Boston Teck. " is a good example of an Engineering college.

Besides thsee universities and colleges, there are technical schools maintained by big manufacturing concerns. They are generally meant for the employees of the factory. These technical institutions are good for those students who are self-supporting and may secure employment in such factories. The teaching in factory schools is much inferior to that of universities or colleges, and foreigners ( specially those from Asia ) have practically no chance to enter such factories.

### A. *Credit System and Credit Defined and Exemplified.*

American college and university education is based on credit system. In many colleges and universities one credit or unit is equivalent to one lecture a week. Thus a student carrying 17 credits or units is attending 17 lectures in a week for a period of one semester, or half-year. A credit is arranged in such a way that a student of average merit has to put in only 3 hours' work a week for it, i. e., one hour's lectnre and 2 hour's work at home to prepare the lesson assigned in the lecture period. Thus, a student carrying 17 credits or units has to put in a total of $17 \times 3 = 51$ hours a week.

In some universities (Chicago, for example) the quarter system is used. At Chicago an under-graduate carries three subjects, reciting in each five times a week for twelve weeks.

### B. *Time and Credit Required for under-graduate work.*

The under-graduate work extends over a period of 4 years. The first year after matriculation is the Freshman year; the second year, Sophomore; the third, Junior; and the fourth year or the year of graduation is Senior year. Students belonging to these classes are known respectively as Freshmen, Sophomores, Juniors, and Seniors.

The four years of under-graduate work are divided into eight semesters,—i. e., there are two semesters in a Col-

lege year. During these four years a student has to complete about 135* credits.

*C. Credit Limit.*

Generally there is a limit to the number of credits one may carry each semester. Usually no one is allowed to take less than 12 credits and more than 17 credits in a semester. Whatever be the number of cridits a student carries, he has to complete 135 credits to get the degrees. Thus, if one takes only 12 credits every semester he has to spend about 11 semesters to become a graduate.

COURSES OF STUDY.

*1. College and Department.*

A—University generally contains 7 Colleges:—

A. College of Liberal Arts and Sciences.
B. College of Engineering.
C. College of Agriculture.
D. College of Medicine.
E. College of Law.
F. College of Commerce.
G. College of Journalism.

(Liberal Arts and Sciences comprise all pure Sciences and subjects; for example— Physics, Chemistry, Botany, History, Literature, Mathematics, etc.)

In some Universities there are additional Colleges than the above mentioned seven - e.g. Colleges of Dentistry.

---

*The requirements in different universities and even in different departments of a university differ. Genenally 130 to 140 units of undergraduate work are required for graduation.

each College is subdivided into various departments, e. g. in the College of Liberal Arts and Science there are Physics department, Chemistry department, Mathematics department, History department, etc. In the College of Engineering for example, there are departments of Electrical Engineering, Department of Civil Engineering, Department of Sanitary Engineering, etc. Similarly there are departments in other Colleges also.

### 2. *Requirements of Different Colleges.*

It has been said before that it requires about 135 credits to graduate and these 135 credits take about 4 years to complete. Now all the Colleges just mentioned do not require the same number of credits for graduation, Generally the College of Engineering credit requirement is more than that of any other College. Thus, in a particular case, the college of Engineering requires 142 credits, while the College of Liberal Arts and Sciences require 132, and the Agricultural College requires only 130.

### 3. *Subjects Taught*

The subject requirement for a degree is a little more complicated than the credit requirement. When it is mentioned that 142 credits are necessary for graduation, it means that those 142 credits should be chosen from a specified group or groups of subjects prescribed by the department. The subjects required fall under three general classes:—

a. Major Subject.

b. Minor Subject.

c. Elective Subject.

(a) A Major subject "consists of courses amounting to 20 hours credits) chosen from among those designated by a department and approved by the faculty of the College. Such courses are to be exclusive those elementary or beginning courses which are open to Freshmen (1st year) and inclusive of some distinctly advanced work."

Sometimes the credit requirement in a major subject is more than 20 but it is seldom more than 24. Major subjects are more or less specialized studies of a particular subject.

(b) Minor subjects are those which are also higher studies for Allied subjects. Thus, for a student of Physics, higher Physics would form Major subject; while higher Chemistry and Mathematics will form Minor subjects A minimum of 20 units of Minor subject is necessary for graduation.

(c) Elective subjects:—Elective subjects are generally those which are prescribed for general culture and are other than the main and allied subjects. Thus, for a student of Physics, Chemistry and Mathematics are allied or minor subjects; while Economics, History, etc., form electives. The number of electives required for graduation is different for different Colleges.

One to six credits constitute a subject and several subjects form a semester's study. To show the relation bet-

ween subject and credit, the following is reproduced from one of the Bulletins of a 1st Class University:—

## CURRICULUM IN CHEMISTRY

First year

First Semester

| | Subjects | hours or credits |
|---|---|---|
| 1. | Noye's Inorganic Chemistry ( non metallic elements )... ... ... ... | 3 |
| 2. | German or French ... ... ... ... ... | 4 |
| 3. | College Algebra ... ... ... ... ... ... | 3 |
| 4. | Plane Trigonometry ... ... ... ... ... | 2 |
| 5. | Rhetoric and Themes ... ... ... ... ... | 1 |
| 6. | Gymnasium ( Physical training ) ... ... | 1 |
| 7. | Military Drill... ... ... ... ... ... ... | 1 |
| | Total ... ... ... ... ... | ...15 hrs. |

First Year

Second Semester

| | | |
|---|---|---|
| 1. | Inorganic Chemistry and qualitative Analysis... ... ... ... ... | 6 |
| 2. | German or French ... ... ... ... ... | 4 |
| 3. | Analytical Geometry ... ... ... ... ... | 5 |
| 4. | Gymnasium ... ... ... ... ... ... ... | 1 |
| 5. | Military Drill ... ... ... ... ... ... | 1 |
| 6. | Drill Regulations ... ... ... ... ... ... | 1 |
| | | 18 hrs. |

The following is from Liberal Art's department:—

General Business Curriculum

First Year

First Semester.

| Subject | hours, or credits |
|---|---|
| Principles of Accounting ... ... ... ... ... | 3 |
| Economic resources ... ... ... ... ... ... | 3 |
| Rhetoric and Themes ... ... ... ... ... | 3 |
| Gymnasium ... ... ... ... ... ... ... | 1 |
| Military Drill ... ... ... ... ... ... ... | 1 |
| College Al_:ebra ... ... ... ... ... ... | 3 |
| Electives ... ... ... ... ... ... ... ... | 4 |
| | 18 hrs. |

Second Semester

| | |
|---|---|
| Principles of Accounting ... ... ... ... ... | 3 |
| Economic History of the U. S , A. ... ... ... | 3 |
| Rhetoric and Themes ... ... ... ... ... | 3 |
| Gymnasium ... ... ... ... ... ... ... | 1 |
| Drill Regulations ... ... ... ... ... ... | 1 |
| Military Drill ... ... ... ... ... ... | 1 |
| | 12 hrs. |

For the first two years of College the subjects taught in various departments of a College are pratically the same. This is specially true for the College of Engineering From the third year specialization begins and the subjects are divided according to Majors, Minors and Electives.

## ACADEMIC YEAR.

### Sessions:

American Universities are scattered throughout a country twice as large as India. The academic sessions begin and close according to local climatic or weather conditions, which vary a great deal.

Nine months of College work constitutes one academic year.

The session begins in September and extends to the end of January; and from February to the middle of Jnne. Thus the academic year is divided into two semesters.

The University of California starts and closes one month earlier. The University of Chicago has four quarters of twelve weeks each.

### *Summer Sessions:*

Summer sessions or more precisely Summer schools as they are called are an unique American institution unknown in India.

Summer vacation lasts for three months from the middle of June to the middle of September.

Almost every large University holds a summer session of about six weeks. Distinguished professors, specialists exchange their seats during this short period teaching in colleges other than their own.

### *Daily Attendance:*

In the Universities class-work lasts from 8 in the morning till 6 in the evening with the intermission of an hour

at noon. The University Library, however, keeps its doors open till 10 P.M., presenting facilities of study and research work to the earnest students.

### *Registration.*

A Student's University career begins with registration. In minor details Universities differ from one another as to the mode of registration, but fundamentally they agree on the main requirements. These are :—

#### ( *A* ) *Adjustment of Prerequisites.*

The Student is required to furnish certificates and diplomas, etc., showing the subjects he has studied before in Indian schools and colleges, as well as certificate of good moral character. By this amount and standard of work the University authorities determine his standing.

#### ( *B* ) *Formalities and Fees.*

After the adjustment of the pre-requisites for entrance into any of the departments or colleges of the University the student has to fill up various forms mentioning intended subjects of study. This must be accompanied by payment of fees when required. Of course the fees vary according to subjects as well as Universities.

#### ( *C* ) *Late Registration.*

An extra charge is made if registration is not completed on the prescribed date. After a certain period has elapsed no more registration is allowed. Students must ensure timely registration by starting from India on such a date that they may reach here in time for registration

*Prerequisites:*

Every student entering a University has 'to fulfill a certain educational requirement which is called Prerequisite. A matriculate of any Indian University, must produce certificates of high school study covering all the subjects necessary for admission. Physics, Chemistry with laboratory work and Solid Geometry and Trigonometry are among the prerequisites. If the student has not taken those subjects in the high school, he has to take them after joining the University here but this work will not be counted for graduation.

It is advisable to come to this country after finishing at least one year of College work though two years of College work in India will make it much easier for the student to follow courses leading to graduation in an American University.

Credits in addition to matriculation for any college work in an Indian university are adjusted as far as they are equivalent to courses given in an American university.

## EXAMINATION SYSTEM.

*A Final Examination and Grade:*

Unlike the Indian Universities, where two years' work is tested by an examination at the end of the period, the American Universities hold examinations at the end of each semester which are final for the courses taken up by a student in that semester. The final grade in any one subject is not the grade obtained in the final examination

that which is made up of grades received in (a) class recitations and (b) class quizzes during the semester and (c) that obtained in the final examination. Th s is true for any subject and for every department; thus, in every lecture-period the instructor assings lessons for the next period. The student prepares the lesson and recites it in the next lecture-period. He is assigned a grade for that particular day's work which depends upon the quality of his recitation. Thus, for every period of class room work the student gets a grade. Again occasional quizzes (examinations) are held during a semester to test the progress of the students and for each of these quizzes the student gets a grade. Thus, the final result of a student (which is determined as has been said before, by semester grades) does not entirely depend upon final or semester examination but upon the progress of the student from day to day. In fact, the final examination counts for only one-third of the final grade and the other two, Recitations and Quizzes, for the remaining two-thirds. Thus a student, who works conscientiously during the semester and keeps a good grade, is allowed to pass even if his grade drops off below the passing mark in the final.

### B. *Final Grade and Failures.*

The full grade for any one subject is 100 and passing grade is 7o, i. e; a student must be 70% efficient to pass in a course. If the final grade of a student is below 7o he fails in that subject, and has to repeat that one subject

in some other semester and not all other subjects which he took along with it. Thus, from the Curriculum of Chemistry for first semester of the freshman year (p. 62) it is seen that a student has to take up 7 subjects including Gymnasium and Military Drill. Now if he fails to pass in College Algebra he has to repeat only that subject in some other semester and not any one of the remaining six. There is a minimum number of credits in which a student has to pass. This minimum varies between 8 and 12. If the final grade of a student is not above the passing mark in this minimum number of credits for two semesters, he is dropped from the roll of the University Thus, at California University if a student cannot keep 8 credits for two consecutive semesters, he is asked to leave the University.

*The Degrees.*

American Universities award the following Degrees:

B. S.—Bachelor of Science.

A. B.—Bachelor of Arts.

LL. B.—Bachelor of Law.

M. S.—Master of Science.

A. M.—Master of Arts.

Ph. D.—Doctor of Philosophy.

D. D. S.—Doctor of Dental Surgery.

Some Universities such as Yale give Ph. B. which means Bachelor of Philosophy and is equivalent to B.S. or A. B. Students in schools of Pharmacy get Ph. G. Graduate in Pharmacy after two years of college work. All of n. hat has been said up till now applies only to under-

graduate work, *i. e.*, to work which prepares one for the degrees of B. S. or A. B. The requirements for the Bachelor's degree are about 135 units of College work which generally extends over a period of four years and comprises the Major subjects, the Minor subjects, the Electives and often a Thesis.

The requirements of Post graduate work will be dealt with under a separate heading.

### *The Graduate School.*

One feature of the first grade American Universities that should particularly commend itself to the Indian students is the ample opportunities of post graduate study and research. Graduation in fact is only the beginning of the higher specialized study. Most of the graduate schools are maintained at a very high level of efficiency; their equipment is most up to date and privileges of specialization are within reach of all earnest students.

The graduate schools offer to college graduates courses leading to the degrees of M. A. and Ph. D., and degrees of corresponding grade in the technical branches.

"They provide", to quote the U. S. Bulletin, "opportunities for advanced study in the arts and sciences and for research similar to those provided by the leading European Universities."

Thus the graduates of the Indian Universities will find it highly profitable to spend a couple of years in any of these graduate schools of America.

*Education of Women.*

In America almost equal care is taken for the education of boys and girls. For women students the opportunities are greater than in any other country. Most of all the State Universities are co-educational; that is, both men and women students are admitted and instructed there.

Besides the co-educational State Universities there are many excellent colleges exclusively for women. In those colleges subjects of special utility and interest to women are given by competent teachers. There are arrangements for indoor and outdoor exercises and physical training. From these colleges healthy, cultured and highly educated women are sent out to take their share of national leadership.

There are already a few women students from India studying in Amercian Universities who find the conditions satisfactory.

*Colleges for Women.*

1. Bryn Mawr at Philadelphia, Pa.
2. Barnard College at Columbia University.
3. Radeliff College at Harward University.
4. College of Women in Western Reserve University.
5. Wellesley College. ( Near Boston. )
6. Simmons College (specializes in Scientific courses) Boston, Mass.
7. Vassar College, Poughkeepsie, N. Y.
8. Gowcher College, Baltimore, Md.

n.

# परिशिष्ट १.

## *Requisites For Entry Into U. S. A.*

According to U. S, A. Immigration Rules, India is in the barred zone and its inhabitants are prohibited immigrants into the U. S. A. There are exceptions amongst whom are Students, professional men, merchants, travellers etc. It is necessary however, to prove the claim for exemption and in order to do so it is necessary to get a document stating the object of going to the United States, the approximate period of stay there in, what occupation has been followed during the first two preceding years at least, what will be the means of maintenance during the proposed period of stay and if the applicant is free from Trachoma, Hookworm, Clonorchis-sinensis-ova ( a sort of worm in liver ), in short, free from any contagious or loathsome disease and is in general good health.

This document must be certified by an official competent to administer oaths and attested by the American Consul nearest to the applicants domicile. It is also necessary to have a letter of invitation from the college to which the student is going for further education and to have a passport duly vised by the Americn Consul. One should note that compliance with above stated conditions will not guarantee admission into the U. S. A.

The right to admit aliens of any race or nationality is primarily vested by law in the Immigration Inspectors at the various ports of entry following a medical exami-

nation, but if they reject any alien he then has the right to appeal to the Secretary of Labour at Washington, who generally holds a special enquiry into his case.

Duplicate copies of all the above certificates must be presented and the school to which the applicant desires to proceed must have made arrangements and given certain guarantees to the Secretary of Labour at Washington, before he can be admitted.

It is suggested that the applicant provides himself with certified duplicate copies of his certificates and write at once to his college requesting them to make the necessary arrangements with the Secretary of Labour so that he will not have any difficulty with the Immigration authorities at his port of entry.

# परिशिष्ट २

हल्लीं अमेरिकेस जपानमार्गानें व युरोप मार्गानें जाण्यास आगबोटींचें दर दरमाणशीं खालीलप्रमाणें आहेतः—

१ (अ) कलकत्ता ते हांगकांग, 'ब्रिटिश इंडिया' (B. I.) 'आपकार' किंवा 'इंडोचायना' ह्या कंपन्यांच्या आगबोटी जातयेत असतात. 'आपकार' कंपन्याचें पहिल्या वर्गाचें भाडें ४७५ रु. व दुसऱ्या वर्गाचें ३२० रु. 'इंडोचायना' कंपनीच्या आगबोटींत फक्त पहिल्या वर्गाच्या प्रवाशांची सोय असते.

(ब) हांगकांग ते व्हंकोव्हरः—(जपान वरून) 'कॅनॅडियन पॅसिफिक स्टीम शिप कंपनीचें पहिल्या वर्गाचें भाडें ३७५ डालर्स (१०० डालर्स = २७५ रु. सरासरीनें) व दुसऱ्या वर्गाचें भाडें २१० डालर्स आहे.

(क) हांगकांग ते सियेटेलः-(जपान वरून) 'ॲडमिरल लाईनचें पहिल्या वर्गाचें भाडें ३७५ डालर्स व 'निपन युसेन कैसा' [N.Y.K.] (Nippon Yussen Kaisa) कंपनचिं पहिल्या वर्गाचें भाडें २७५ डालर्स आहे.

२ (अ) मुंबई ते हांगकांगः 'पेनिनशुलर ॲंड ओरिएंटल स्टीम शिप' (P.&.O.) कंपनीच्या दर पंधरवड्यांत आगबोटी जातात. ह्या आगबोटचिं पहिल्या वर्गाचें भाडें ४० पोंड (१ पौंड=१५ रु. सरासरीनें) व दुसऱ्या वर्गाचें भाडें २२ पौंड आहे. केव्हां केव्हां 'निपन युसेन कैसा' कंपनीच्या बोटीहि जातात. ह्या आगबोटीचें पहिल्या वर्गाचें भाडें ४८० रु. असून दुसऱ्या वर्गाचें भाडें २७०रु. आहे.

(ब) कलकत्ता ते हांगकांग १ (अ) मध्यें दिल्याप्रमाणें.

(क) कोलंबो ते हांगकांग पी. ॲंड ओ. किंवा 'निपन युसे

कैसा ' कंपनीच्या आगबोटींचें पहिल्या वर्गाचें भाडें ३६ पौंड व दुसऱ्या वर्गाचें २० पौंड आहे.

( ड ) हांगकांग ते सॅनफ्रॅन्सिस्को:-( जपान हानोलुलुवरून, ) ' टोयो किसेन कैसा ' ( T. K. K. ) किंवा ' पॅनामा पासिफिक ' कंपनीच्या मेल स्टीमरचें पहिल्या वर्गाचें कमींत कमी भाडें ३७५ डालर्स, ' टोयो किसेन कैसा ' कंपनीचे दुसऱ्या वर्गाचें कमींत कमी भाडें १८८ डालर्स आहे.

३ ( अ ) मुंबई ते इटालीच्या पूर्व पश्चिम किंवा दक्षिण समुद्र किनाऱ्यावरील कोणत्याही बंदरापर्यंतः-' लॉईड ट्रॅस्टिनो ' व ' मॉरिटिमा इटालियाना ' कंपन्यांची जहाजें जातात. प्रवाशयांची फार गर्दी असते त्या ऋतूंत पहिल्या वर्गाचें भाडें ६२ पौंड व दुसऱ्या वर्गाचें भाडें ५२ पौंड असून इतर ऋतूंत पहिल्या वर्गाचें भाडें ५४ पौंड व दुसऱ्या वर्गाचें भाडें ४४ पौंड असतें.

( ब ) नेपल्स ते न्युयार्क: ' लॉईड सॅबाडो ' कंपनीचें पहिल्या वर्गाचें भाडें २५० डालर्स व दुसऱ्या वर्गाचें ४० पौंड आहे.

४ ' एलर मॅन ' ' बॅकनाल स्टीमशिप ' कंपन्यांची जहाजें कलकत्ता किंवा कोलंबोहून न्युयार्क किंवा बोस्टनला केव्हां केव्हां जात असतात. ह्यांचे दर खालील प्रमाणें:—

| | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| कलकत्ता | ते | न्युयार्क | किंवा बोस्टन | पहिल्या | वर्गाचें | भाडें | पौंड | ९० |
| ,, | ,, | ,, | ,, | दुसऱ्या | ,, | ,, | ,, | ७० |
| कोलंबो | ,, | ,, | ,, | पहिल्या | ,, | ,, | ,, | ८५ |
| ,, | ,, | ,, | ,, | दुसऱ्या | ,, | ,, | ,, | ६७ |

टीप—आगबोटींच्या दरांत वेळोवेळीं फरक पडत असतो. ह्याकरितां अमेरिकेस जावयाचें झाल्यास वेळेवर दरासंबंधीं व प्रवासाच्या इतर सोयींसंबंधीं माहिती करितां खालील ठिकाणीं पत्रव्यवहार करावा—

Thos. Cook & Son Ltd.
P. O. Box 46.
*Bombay.*

३. **वर्गणीदारः**-चार आणे प्रवेश वर्गणी भरून मालेचे कायम वर्गणीदार होणारांस मालेचें पुस्तक पाऊणपट किंमतीस मिळेल.

मालेच्या द्वितीय पुष्पांत आश्रयदाते, हितचिंतक व सहाय्यकांचीं नांवें प्रसिद्ध करण्यांत येतील.

पुष्प १ लें **अमेरिका पथ दर्शक** प्रस्तावनाकारः-**दा. वि. गोखले** बी. ए. एल्. एल्. बी. संपादक '**मराठा**' अमेरिका जिज्ञासू, विद्यार्थी प्रवासी व व्यापाऱ्यांस फारच उपयुक्त पृ, सं. ८० किं. फक्त ८ आ.

पुष्प दुसरें **अमेरिका दिग्दर्शनः**—( छापत आहे. ) प्रस्तावनाकार-श्री. **ज. स. करंदीकर** बी. ए. एल्. एल्. बी. सहसंपादक '**केसरी**' ह्यांत अमेरिकन विद्यार्थी, स्त्री पुरुष, शेतकरी वगैरेचें स्वभाव धर्म, चालीरीती कर्तृत्व वगैरे संबंधीची मनोरंजक माहिती असून शिवाय अमेरिकेंतील प्रेक्षणीय संस्था व शहरांची बोधप्रद, मार्मिक व चित्ताकर्षक वर्णनें आहेत. सदरहू पुस्तकांतील विविध माहितींत उपयुक्त भर म्हणून आम्हीं पूर्वी टिळक महाविद्यालयाच्या त्रैमासिकांत प्रसिध्द केलेला व माहितीची भर घालून वाढविलेला 'अमेरिकेंतील संयुक्त संस्थानांची शासन पद्धति' हा लेख ह्या पुस्तकास परिशिष्ट रूपानें जोडला आहे. अमेरिकेंतील लोकस्थिती कळून येण्यास हें पुस्तक फारच उपयुक्त आहे. पृ. सं. सुमारें १७५ किंमत १ रु. पत्रव्यवहार खालील पत्त्यावर मराठींत किंवा इंग्रजींत करावा.

पत्ताः—संपादक **अभिनव—ग्रंथमाला**, ३६८ नारायण पेठ,
पुणें शहर.